हें पुस्तक

तीर्थरूप कैलासवासी

लक्ष्मण मोरेश्वर बरवे

यांचे चरणीं समर्पण.

वि. ल. बरवे.

## लेखकाची टीप

विनोदी नाटकाचा प्रमुख मनोरंजन हा होय, त्याला प्रस्तावनेची कांहींच जरूरी नसते. प्रस्तुत नाटक पहाण्याला अगर वाचण्याला सुरुवात करणें हीच प्रस्तावना होईल. मराठी रसिकांनींच ती प्रस्तावना करावी.

" लग्न-मंडप " हें श्रीसमर्थ नाटक मंडळीनेंच रंगभूमीवर आणलें असल्यामुळें या " नाटका "बद्दल मीं अगदींच बेफिकीर आहें.

बुद्धिवान् नट हेच नाटकाचे खरे मर्मज्ञ असतात.

सदर नाटकाचें सर्व लेखन १९२३चे जुलै महिन्यांत मुंबई येथें झालें असून पहिला नाट्य-प्रयोग ३ डिसेंबर १९२७ रोजीं धुळें येथें झाला.

या नाटकांतील प्रसंगरचना थोडीफार पाश्चिमात्य धर्तीवर झाली आहे ती सहेतुक आहे.

विनायक लक्ष्मण बरवे,
चिपळूण.

श्रीगजानन.

# " लग्न-मंडप "



## अंक पहिला.



### प्रवेश पहिला.

( स्थळः—दिवाणखाना. गोलमेजाभोंवती ४ खुर्च्या. दोन कोचें. कोपऱ्यांत २ पाट. पात्रें:—श्रीरंगशास्त्री अध्ययन करीत बसले आहेत. जवळच नंदिनी पानाचे विडे करीत बसली आहे )

**नंदिनी:**—ऐकलं का चित्रांगी माझं ऐकणार नाहीं आपली लाडावलेली ती ! आपण माझ्याकरितां तिची समजूत घालून तिला मनाजोगतं वागायला लावायची ! तरी बरं ! भावी जामातानीं, म्हणजे हेमंतरावांनीं तिला अजून पाहिली नाहीं, व तिनंहि हेमंतरावानां पाहिलेलं नाहीं. नाहीं तर हें लग्न म्हणजे कायसासा प्रेमविवाहच झाला असता. आमच्या बिहारी भावजीनी नाही का एका नायकिणीच्या पोरीशीं प्रेमविवाह केला.

**श्रीरंगः**—( स्व. ) ती वेश्येची मुलगी आहे कीं काय गौडबंगाल आहे हें हिला काय सांगायचं ! ( उ. ) हो काळच तसा आहे. हेमंतरावांचा आजपर्यंतचा काळ अलाहाबादला शिक्षणांत गेला. ते पहिल्यांदाच इकडे येणार आणि ते सुद्धां स्वतःच्या लग्नाकरितां. त्यांच्या वडिलांची तुला आठवण असेलच !

**नंदिनीः**—हो. हें काय विचारायचं ? इकडचे ते जीवाभावाचे स्नेही. आपली चित्रांगी जन्माला आली तेव्हांच त्यांनीं मागणी घालून ठेवलेली. हेमंत पांच वर्षांचा होता तेव्हांच ते वारले नव्हे ?

**श्रीरंगः**—हो ! मात्र हेमंत हा खरा पुरुष यांत शंका नाहीं. वयाच्या दुसऱ्या वर्षी आईचं मरण, आणि पांचव्या वर्षी बापाचा स्वर्गवास ! अलाहा-

बादसारख्या बिन जिव्हाळ्याच्या छायेंत राहून, न खुरडतां स्वतःच्या हिमतीवर एम्. ए. होणं म्हणजे पुरुषार्थ नाहीं असं कोण म्हणेल ?

**नंदिनीः**—एम्. ए. झाले नाहीं ! मग स्वतः मुलगी पाहायला कसे आले नाहींत ? आयत्या वेळीं नकार तर देणार नाहींत ना ?

**श्रीरंगः**—तूं किती भाबडी आहेस ! निव्वळ वडिलांच्या इच्छेखातर हेमंत आपल्या चित्रेशीं लग्न लावणार आहे. त्यामुळं मुलगी पसंत नापसंतीचा प्रश्न अजिबात गौण ठरतो. आणि म्हणूनच मुलगी पाहण्याचं त्यानीं नाकारलं.

**नंदिनीः**—हो, नाहीं तर मुहूर्त चार दिवसावर येऊन ठेपला ! एखादे नाकारायचे. ( आठवून ) चित्रांगीच्या लग्नाला पण वऱ्हाड पुष्कळ जमवायचं बरं का ? व्याही, विहिणी, करवल्या, ताशे, वाजंत्री अगदी मारे गर्दी करून सोडायची बरं का ! नवरदेवाबरोबर कोणकोण येणार ?

**श्रीरंगः**—अग, या चांभारचौकशांची आपल्याला गरज काय ? कोणी येतील अगर न येतील. म्हणे वऱ्हाड ! वऱ्हाडी माणसं म्हणजे निव्वळ कापसाचे गठ्ठे ! वर्षांनुवर्षं दाबून ठेवलेले मनोविकार लग्नप्रसंगीं उघडे होऊन लागतात रुसायला फुगायला !

**नंदिनीः**—तसं नव्हे. हेमंतरावांचीं जवळचीं अशीं कोण माणसं आहेत.

**श्रीरंगः**—त्यांचा एक चिकट व व्यवहारी चुलता आहे. वृद्धाचं नांवहि कृतीप्रमाणंच कंगाल आहे. हे कंगालराव व हेमंतराव अशी जोडी येईलसं वाटतं.

**नंदिनीः**—सारंच विचित्र बाई ! लग्नाला धड वऱ्हाडीहि नाहींत, विहिणीहि नाहींत—

**श्रीरंगः**—रडायला जशा भाड्यानं बायका मिळतात तशा रुसायला विहिणी मिळत नाहींत.

**नंदिनीः**—हें लग्न कसं उरकतं कोण जाणें ! आधीं तिला मोठी वाढविलीत—

**श्रीरंगः**—चुकलं खरं—

**नंदिनीः**—तिला लाडूबाई आणि कोमळ जाई बनवून ठेविलीत—

**श्रीरंगः**—फार वाईट झालं—

**नंदिनीः**— सासूसासरा नाहीं—

**श्रीरंगः**—मूर्ख परमेश्वर ! हाल करायला सासूहि असूं नये—

**नंदिनीः**—वऱ्हाड नाहीं, सोहाळे नाहींत, चार दिवसाचं लग्न नाहीं.

**श्रीरंगः**—अरेरे, माझ्या लक्षांतच ही गोष्ट आली नाहीं.

**नंदिनीः**—एकुलती एक मुलगी—

**श्रीरंगः**—आणि तिच्या लग्नांत एकाहि चेष्टाचाराला जागा मिळूं नये. अधर्म, अधर्म, अगदींच ब्राह्मणधर्मेतर लग्न! तुझी फिरून फिरून गम्मत वाटते! हें पहा. तुझ्या बहिणीच्या–कल्याणीच्या लग्नांत या साऱ्या आचरट रूढाचारांच्या, केवळ तुझ्या आग्रहाकरितां, स्वतंत्र प्रयोगाची योजना करूं. मग तर झालं?

**नंदिनीः**—तेवढं मोठं भाग्य माझं आहे कुठं? चित्रांगीबरोबर लहानाची मोठी होण्यानं आजकाल तिनं चित्रेच्याहि पुढं धांव घेतली आहे. ती तर म्हणते कीं, स्वतः पुरेसा पैसा मिळवल्याशिवाय आपण लग्नच करणार नाहीं!

**श्रीरंगः**—वेडीच ती. तरीपण गरीब हिंदुस्थानच्या हालअपेष्टांत लग्न झाल्यावर बाळंतवास काढणाऱ्या आजच्या शीलवंत कुमारिकांना जर बिनचूक मार्ग दाखविल तर कल्याणीच दाखवील.

**नंदिनीः**—अशा बोलण्यानं सारे लोक इकडे हंसल्याशिवाय रहाणार नाहींत!

**श्रीरंगः**—अग, ती थट्टा! माझ्या म्हणण्यांत कांहीं तथ्यांश नाहीं. तसं होऊनच उपयोगी नाहीं. अग, श्रीमंत वराकरितां कुत्र्याप्रमाणं लाळ घोटण्याचे शुभमुहूर्त फुकट जातील, हुंड्याचे सट्टेबाजार ओस पडतील, नवऱ्यावर विशेषसं अवलंबून न रहावं लागल्याकारणानं स्त्रीच्या दासीवृत्तीचा लय होईल, आज जे निव्वळ शिक्षणाला व पैशाला महत्व मिळत आहे, ते नंतर वराच्या गुणाला व कुलशीलाला मिळत जाईल व सैतानी श्रीमंतीचा नक्षा उतरल्या कळेला लागेल, असले शेंकडों द्रव्याघात, बुद्धिपात होतील. वेडी कल्याणी! नंदे, कल्याणीचं लग्न आपण जबरीनं उरकून घेऊं.

**नंदिनीः**—जबरदस्तीनं! असं कुठं झालंय का?

**श्रीरंगः**—जें कुठें घडलं नाहीं तें घडवून आणणं हेंच माझ्या आयुष्याला जडलेलं भयंकर व्यसन आहे. नेहमीच्या वृथा रूढाचारामुळं आत्महत्याहि करून घ्यावी असं मला हरहमेश वाटतं. प्रौढ नवरानवरीचं लग्न एकमेकांची ओळख असल्याशिवाय आजपर्यंत झाल्याचं एकहि उदाहरण नाहीं. चित्रेच्या बाबतींत मी तसला प्रकार घडवून आणणार. तद्वतच तुझी बहीण

कल्याणी व आमचे बंधू शिशीर–आता मेस्पॉटमधून येतीलच ते–त्यांचं लग्नहि तसंच उरकून घेऊं. हें पहा त्यांचें पत्र आलं आहे.

( तो पत्र उघडून तिच्या हातांत देतो व जवळच बसून दोघेंहि वाचूं लागतात तोंच चित्रांगी प्रवेश करते. )

**चित्रांगीः**—हे ग काय आई ? आतां या वयांत ही अमर्यादा चांगली का ?

**नंदिनीः**—अग कारटे ! फारच बहकलीस बरं. कांहीं शरम ? अहाहाहा ! कशी आहे लाडकी बाळी !

**श्रीरंगः**—चित्रा, आम्ही दोघांनीं कधीं जवळ बसूंच नये होय ? ही अमर्यादा चांगली का ?

**चित्रांगीः**—माझी अमर्यादा म्हणजे आश्चर्याला फुटलेली वाचा होय ! मर्यादेतून शर्मेचा जन्म होतो आणि शरमेच्या जन्मदात्रीशीं मी काडीमोड केली आहे.

**श्रीरंगः**—चित्रे, तुझी तत्वं दिवसेंदिवस विक्षिप्त बनत चाललीं आहेत

**चित्रांगीः**—वृथारूढि झुगारण्याच्या बाबतींत मर्यादा व शरम या दोन गोष्टीमुळंच हिंदु संस्कृतीची पीछेहाट होते असं आपणच म्हणता ना ?

**श्रीरंगः**—सत्याच्या बाबतींत मर्यादा आणि शरम या पार झुगारल्या पाहिजेत एवढाच त्याचा अर्थ.

**चित्रांगीः**—म्हणजे मी सत्याच्या बाबतींत अमर्याद वागले ही माझी चूक तर ? सत्याच्या बाबतींत सडेतोडपणा तुम्हींच मला शिकवलात ना ? मग मी तुमच्याशीं इतक्या शुद्ध स्वातंत्र्यानं वागूं नये तर कुणाशीं वागावं ?

**श्रीरंगः**—पोरी, अशी गळेपडूपणानं वागूं लागलीस म्हणजे तुझे सारे गुन्हे, साऱ्या स्त्रीजातीचे गुन्हे तुझ्यामुळं माफ करावेसे वाटतात. तरीपण या गोष्टीचा मला फार राग आला आहे. असं परत केव्हांहि करूं नको.

**चित्रांगीः**—नाहीं करणार. पण एक अट आहे

**श्रीरंगः**—ती कोणती ?

**नंदिनीः**—हें असलं अटीतटीचं कन्याप्रेम आपल्याला चागलंच भोंवेल बरं !

**चित्रांगीः**—बाबा, आईला माझी वागणूक आवडत नाहीं तर तिनंच लहानपणांतल्यासारखा माझा एक गोड मुका घेतला पाहिजे. हीच माझी अट.

**श्रीरंगः**—तुझ्या आईच्या ठायीं मावणारा अवघा अपत्यस्नेह तुझ्या दोनच गालावर टक ठेवून आज इतकी वर्षं नांदत आला आहे. तेव्हां आजच्या स्थितींतहि तुझा मुका घेण्यांत तिचं हृदय उचंबळूनच येईल.

**चित्रांगीः**—घेनाग आई ( तिच्याजवळ जाते )

**नंदिनीः**—मला नाहीं असला चटोरपणा खपत.

**चित्रांगीः**—कां ग? मी तुझी एकुलती एक मुलगी ना?

**नंदिनीः**—अग, पण तूं मोठी झालीस, वयांत आलीस, प्रौढेचे मुके कुणी घेऊं नयेत.

**चित्रांगीः**—कां घेऊं नयेत?

**नंदिनीः**—अग, आजकालचे ते प्रौढविवाह अशाच कसल्याशा संवयीनं होत असतात असं म्हणतात.

**चित्रांगीः**—बाई, बाई, बाई, बायकांना म्हातारपणी पुरुषी वळण येतं तें हें असं. आई असं काय बोलतेस! तूं माझी आईना! नाहीं घेत! थांब मीच तुझा मुका घेते. ( आईचा मुका घेते )

**नंदिनीः**—तुझ्या या आचरटपणांतून केव्हां एकदा सुटेनसं झालं आहे.

**चित्रांगीः**—तुझ्या माझ्यापैकीं कोणी तरी एक खलास झाल्यावर.

**नंदिनीः**—हां. चूप! भरल्या घरांत असं बोलूं नये.

**श्रीरंगः**—तूं तिला चाळवतेस आणि मग गोरीमोरी होतेस. एक शिवरात्र आणि दुसरी नवरात्र.

**चित्रांगीः**—बाबा, मला नवरात्र ह्मणतां? नवरात्र आश्विनाच्या पोटीं जन्माला येत असतं!

**श्रीरंगः**—म्हणजे? मी अश्व व ही आश्विनी?

**चित्रांगीः**—असं कुठं मी ह्मटलं? बाबा, मी जवळ असल्यावर तुमचा सारा आनंद नवा अवतार घेतो असं तुह्मींच ह्मणतांना?

**श्रीरंगः**—होय, अपत्य ह्मणजे आनंदी बापाच्या तारुण्याचा इतिहास होय! तारुण्याचा आनंद इतका विलक्षण असतो कीं, तो मुलांच्या रूपानं जगावर एकीकृत करून ठेवावा लागतो. मूल ह्मणजे भिकार वृद्धावस्थेंत पुरणारी गतायुष्याच्या आनंदाची ठेव. ही माझी एकच ठेव कुठ ठेवूं व कुठ न ठेवूं असं मला झाल आहे.

**चित्रांगी**:—कमलाचा मऊपणा अदमासून पहातांना लक्ष्मीची चंचल प्रकृति निराश होईल, वीणेवरील स्वरांचा प्रदेश आक्रमितानां सरस्वतीची बोटंहि लुली पडतील, परंतु, बाबा, माझ्यावरचं गूढ प्रेम व्यक्त करण्यांत आपण मात्र केव्हांहि विरमणार नाहीं.

**श्रीरंग**:—पोरी, तूं मात्र अपत्यस्नेहाचं हें वाक्य, उद्या लग्न झाल्यावर नवऱ्याशीं विराम पावून पुरं करून टाकशील.

**नंदिनी**:—ह्मणजे, तिचं लग्नसुद्धां होतां उपयोगी नाहीं वाटतं ?

**चित्रांगी**:—नाहीं, मला कुवार बाळगून तुझ्यासारख्या देवतेला मुरळी वहायची आहे.

**नंदिनी**:—ती एक कल्याणी तशी आणि तूं ही अशी. या दोन उभार पोरी घरांत असल्यावर–( कल्याणी हातांत एक पत्र घेऊन येते व खुर्चीवर बसते. )

**श्रीरंग**:—माझं घर ह्मणजे श्रीसरस्वतीचं माहेरघर असं मला वाटेल. बाळ कल्याण, आज तूं अशी उदास कां ?

**कल्याणी**:—चित्रांगीच्या वृंदाकाकूकडून सर्वांना हवालदिल करण्यासारखं हें पत्र आलं आहे. चित्रेच्या नांवाचं पत्र आहे. पण मी फोडलं.

**नंदिनी**:—बिहारीभावजींनीं–आपल्या पाठच्या बंधूराजांनीं–एका नायकिणीच्या पोरीशीं प्रेमविवाह लावणाऱ्यांनीं–अशींच कांहींतरी करामत करून दाखविली असली पाहिजे ! कांग, आणखी कांहीं नवीन व्यसन लागल्याचा मजकूर आहे वाटतं ?

**चित्रांगी**:—काकांच्या घरीं अजून वारयोषितांचं संमेलन होत असतं असं दिसतं एकुण ?

**श्रीरंग**:—एवढंच ना ? त्यांत काय आहे ! मी ह्मटलं कीं बिहारीचं वेश्याव्यसन सुटलं कीं काय !

**चित्रांगी**:—वृंदाकाकूनं काय करावं असं मी तिला लिहूं ?

**कल्याणी**:—तूं तिची मसलतगार होणार कीं काय ?

**चित्रांगी**:—मसलतगारशीं काय पण बिहारीकाकांचं हें वारांगनेचं बंड अजिबात मोडून टाकण्याचा मी विडा उचलला आहे.

**नंदिनी**:—जें आवडेल तें करायला पुरुष बायकांची का मुर्वत धरणार आहेत.

**चित्रांगीः**—जुन्या बायका पुरुषांना नसतं महत्त्व देतात.

**कल्याणीः**—आणि नवे पुरुष बायकांच्या पुढं उगीच लाळ घोटीत असतात !

**श्रीरंगः**—हा अनुभव तुला आमच्या तिसऱ्या बंधूनीं-शिशीरकाकांनीं आणून दिला वाटतं ?

**चित्रांगीः**—ते आणखी तिसरेच खुळे चुलते. बाबा तुमचे हे दोन्ही भाऊ असे आचरट कसे हो ?

**श्रीरंगः**—अग, आह्मीं हे असे त्रिदोष ह्मणून आमच्या आईबापांना अवेळीं मरण आलं !

**कल्याणीः**—चित्रे, वृन्दाकाकूंच्या काकुळतीकडे जरा लक्ष दे.

**चित्रांगीः**—मी वृन्देला साफ लिहिणार कीं, तूं वाटेल तें कर, पण काकांचे हे नाचरे चाळे अजिबात सुटले पाहिजेत. आपल्या नवऱ्याला निव्वळ ताळ्यावर आणण्याकरितां ह्मणून, त्यांच्या बायकांनीं, नवरे चक्कर मारायला चालले कीं आपणहि बेलाशक बाहेर पडावं. त्यांत वृन्दाकाकू तर नायकिणीची पोर. मातृवंशांतला गूण आचारांत आणला कीं हे बाहेरख्याली नवरे चटदिशी नांगी टाकतील.

**नंदिनीः**—ऐकलं का ! मला आतां काशीस तरी नेऊन ठेवा.

**कल्याणीः**—चित्रे, तुझ्या या वेडगळ विचारामुळं माझी ताई काशीस चालली बरं !

**श्रीरंगः**—( नंदिनीस ) हें बघ, या पोरीचं काय काय होत आहे तें पाहूं, आणि तूं व मी एकदम जाऊं. चित्रे, एकंदरींत तूं वृन्देला असा मजकूर लिहिणार ?

**चित्रांगीः**—हो अवश्य लिहिणार, आणि त्याच मार्गानं वृन्दाकाकूकडून काकाना ताळ्यावर आणणार.

**श्रीरंगः**—( स्व. ) या कामीं माझी पूर्ण अनुमती आहे. पण तें चार चौघांत सांगण्याची सोय नाहीं. आजकाल " विवेक " कुणाला नको आहे. " भावना " पाहिजे आहे. ( उ. ) चित्रे, असे वेडेचार प्रतिपादण्यांत हिंदुसमाजाच्या आवडत्या रूढाचारांच्याहि वर-ताण करणार आहेस. वेडी कुठली. तुझं आतां लग्न होणार, तुला नवरा मिळणार, लग्न ठरलंसुद्धां, मुहूर्त कायम झाला.

**चित्रांगी:**—लग्न ठरलं,-माझं,-कुठे-कुणाशीं,-कधीं,-केव्हां ? मला कळवलंसुद्धां नाहीं. बाबा, हें चांगल का ? पांचपन्नास स्थळीं दाखवण्याकरितां माझी धिंड सुद्धां काढली नाहींत. बरं तसं नाहीं तर नाहीं, पण मला कुणावर प्रेम करायलासुद्धां सवड दिली नाहींत. म्हणजे माझ्या लग्नाची ठरवणूक जुन्याहि पद्धतीची नाहीं व नव्याहि प्रकारची नाहीं.

**श्रीरंग:**—मी म्हणेन ती पूर्व, असं तुझं व्रत ना ?

**चित्रांगी:**—हो. म्हणूनच मी हे सर्व शांतपणान ऐकून घेतलं. पण बाबा, आमचे हे पतिराज चांगले श्रीमंत आहेत ना ? रहाणार कुठले ? कुणाचे कोण ? निदान स्वतः शिकलेले नसले तरी एखाद्या जे. पी. चे चिरंजीव अगर श्रीमंताचे दत्तक असले म्हणजे झालं.

**श्रीरंग:**—ते कांहीं तसे नाहींत. पण हे पहा रंगेलराव. तूं म्हणतेस तशा तऱ्हेचे गृहस्थ तुला पहायला आले आहेत. ( रंगेलराव विलायती पोषाखांत येतो. )

**रंगेल:**—( स्व. ) जी मुलगी मला दिसते ती एकदम माझ्या हृदयांत शिरते व कुणीहि मनुष्य माझ्याकडे पाहूं लागला कीं मुलगी देण्यासाठींच माझ्याकडे पाहतो असं वाटतं. ( नंदीनी नाक मुरडून आंत जाते ) म्हाताऱ्या बायका मात्र मला नाक मुरडून चालत्या होतात. ( उघड ) Good Morning ( कोणीही घेत नाहींत. ) नमस्कार.

**श्रीरंग:**—मुलीनों, यांची तुम्हाला ओळख करून देतों, हं ! हे गृहस्थ मला Express मध्यें भेटले. बोलणारा जबर, बहुश्रुत, ओळख दाट, वाटेल त्याच्या जवळ क्षणांत प्रेम संपादन करणारे, असे हे सभ्य गृहस्थ आहेत. नेहमीच्या आगगाडीच्या पद्धतीप्रमाणें मी यांना घरचा पत्ता देऊन सहज भेटायला बोलावलं होतं, ते हे आले आहेत. बरं रंगेलराव, माझी ही मुलगी चित्रांगी, व ही माझी मेहुणी कल्याणी, दोघीहि अविवाहित आहेत—

**रंगेल:**—( स्व. ) एकंदरींत यांनीं मला मुली पहायला बोलावलं. आतां पहिलीला पाहूं, कीं दुसरीला पाहूं, कीं एकदम दोघींना पाहूं. पण तूर्त दोघींकडेहि न पहातां हा म्हातारा इथं असेपर्यंत याच्याकडे पाहूनच काळ कंठला पाहिजे. इलाज नाहीं.

**श्रीरंग:**—काय पान बीन ?

**रंगेलः**—छे, छे, नको.

**श्रीरंगः**—सिगारेट चिरूट ?

**रंगेलः**—छे, छे, मी ओढीत नाहीं.

**श्रीरंगः**—बरं, चहा तरी ?

**रंगेलः**—नको हो. चहा कसला घ्यायचा.

**कल्याणीः**—पाणी व फराळाचं आणू का ?

**रंगेलः**—नका घेऊं तसदी ( यांची मेव्हणी तर घायाळ झालीच. एरव्ही या कोकिळेला कंठ फुटला नसता. )

**कल्याणीः**—खरंच आणू का फराळाचं ?

**रंगेलः**—अं. हं ! नको.

**चित्रांगीः**—बरं. गवत, पेंड, दाणा, तोबरा असं कांहीं आणू का ?

**रंगेलः**—हँ. हँ. हँ. हँ ! कशाला इतकी तसदी घेतां आपण ?

**चित्रांगीः**—म्हणजे माणसाचे पदार्थ तुम्हाला नकोतच पण गुरासारखेहि तुम्हीं वागत नाहीं.

**श्रीरंगः**—हें पहा रंगेलराव, समाजांत गेल्यावर समाजासारखं व्हावं लागतं. कुणी विचारपूस केल्यावर पाहुण्यानं नाहीं म्हटलं कीं विचारणाराला वाईट वाटतं.

**रंगेलः**—बरं तर ! चहा, चिरूट व पान, तिघांच्याहि स्मरणानं चहासाठीं घशाला कोरड पडली आहे, चिरूटाची हुक्की आली आहे, व पानाची तलफ लागली आहे. घ्यावंच पान, ओढावाच चिरूट.

**चित्रांगीः**—मग आरंभींच संकोच न धरतां, सरळपणानं वागले असतात तर काय position बिघडली असती ?

**रंगेलः**—हें पहा. कसंही असलं तरी हे आमचे शिष्टाचार आहेत. बाकी शास्त्रीबुवा तुमच्या मुली–म्हणजे मुलगी आणि मेव्हणी–फार हुशार, फारच हुशार, समाजाची गोम नेमकी वेळेवर नजरेस आणली—

**श्रीरंगः**—पण असलं बोलणं बायकांना वाईट ?

**रंगेलः**—वाईट ? अवश्य बोलावं. काकविष्टेपासूनच पिंपळ होतात. वाइटां-तूनच चांगलं निघतं. या तुमच्या मुलीचं वय काय बरं ?

**चित्रांगीः**—आपलं वय काय ?

रंगेलः—वय खरं आहे २३ पण असावं २५. कारण २ सेन्सस्‌ना नांव न दिल्यामुळं दोन वर्षांची बचत झाली आहे.

श्रीरंगः—वयाच्या मानानं उतार दिसतां ?

रंगेलः—शोकपर्यवसायी नाटकाचा ५ वा अंक हा जसा एक प्रकारचा मारक रोग आहे, तद्वतच बालपणाचा शेवटचा अंक-तारुण्य-हाहि एक मारक रोग आहे. तारुण्याचा रोग अनावर झाला कीं माणूस उतार दिसूं लागलाच.

चित्रांगीः—अस्सं ! तुह्मीं अविवाहित दिसता ? मग स्त्रियांबद्दल तुमची मतं काय आहेत ?

रंगेलः—माझ्या या मागच्या पांच वर्षांच्या मुदतींत, कमींतकमी मला एक हजार प्रणयपत्रिका आल्या असतील, तरी अजून मी अविवाहित आहे. स्त्रीबद्दल ह्मणाल तर स्त्री ही एक कोकिळा. आवाज उत्तम.

श्रीरंगः—पण उपयोग नाहीं काडीचा. निव्वळ निरुपयोगी काव्य.

रंगेलः—स्त्री ही एक अजब चीज आहे. सर्वांचं सर्व प्रकारचं देणगी-स्थान जर कुणी असेल तर ती स्त्री. कवि, तिला अनादि अनंत उपमा देतात, सागर मौक्तिकं देतात, पृथ्वी सुवर्ण देते व मी तिला मान देतों. पुरुष ह्मणाल तर—

कल्याणीः—एक गोणी लादलेली उद्योगदेवता. आवाज उत्तम.

चित्रांगीः—ह्मणजे कोण गाढव ? वाग वा ?

रंगेलः—शोडष वर्षांच्या गर्दभेची स्थिति लक्षांत आणली ह्मणजे पुरुष गाढवच. शास्त्रीबुवा, दोघीनाहि १६ वर्षें उलटून गेली असतील नाहीं ? बरं यांचीं लग्नं केव्हां करणार आहांत ?

चित्रांगीः—आमची दोघींचीहि लग्नं बरोबरच होणार. नाहीं ग मावशी?

श्रीरंगः—हो, हो, रंगेलराव बरी आठवण झाली. आमच्या चित्रांगीचं लग्न ठरलं. बरोबर चार दिवसांवर मुहूर्त. तुह्मीं अवश्य यायचं. का आज-पासूनच इकडे रहाता ?

रंगेलः—Oh yes ! Most gladly! ( स्व. ) आतां कल्याणीचंहि लग्न ठरलं असं पुढं सांगणार कीं काय कोण जाणे !

चित्रांगीः—रंगेलराव, रहाच तुह्मीं. तुमच्यासारखी चुरचुरीत तोंडपाळ बरेच दिवसांत लाभली नाहीं. हें पहा. आतां आमचे धाकटे काका,-शिशीर-

मेस्पॉटहून दोन दिवसांनीं येणार ह्मणून तार आली आहे. आमच्या मावशीचे ते प्रणयराज आहेत प्रणयराज !

**कल्याणीः**—अग, हें कशाला बोललीस. तो पहा त्यांनीं फिरून चेहरा गाळला.

**रंगेलः**—( स्व. ) एकुण यांची नुसती लग्नं पहाण्याचा प्रसंग येणार तर. इथं येतांना मांजर तर आडवं गेलं नाहीं ? अरे हो, विधवाश्रमावरूनच मी आलों. ( उ. ) नाहीं तसं कांहीं नाहीं. या वार्तेबाबतहि मला आनंदच होत आहे.

**चित्रांगीः**—त्याशिवाय आमचे दुसरे चुलते-बिहारी हे सुद्धां आले तर येतील त्यांची वृंदा अशी गमतीदार आहे की काय सांगू ? तुमची पुष्कळ स्त्रियांशीं ओळख होईल.

**रंगेलः**—ही नांवं मी एकलेलीं आहेत. इथून जवळच ते रहातात नाहीं ? ( स्व. ) आतां एका नवीन स्त्रीची ओळख होणार तर! तिचं लग्न झालेलं नसेलच बहुधा ( उ. ) शास्त्रीबुवा, मी असं करतों. लग्नाच्या आदल्या दिवशीं येईन. ( स्व. ) ही वृन्दा बिहारीची मुलगी असावी.

**श्रीरंगः**—ठीक आहे. नमस्कार.

**चित्रांगीः**—मग असं करा रंगेलराव, मी देतें हें पत्र बिहारीच्या घरीं तुह्मीच नेऊन द्या.

**रंगेलः**—Oh very gladly ( स्व. ) ही वृंदा नावांप्रणाणेंच मोठी गोड मुलगी असावी हं.

**चित्रांगीः**—चला तर, मी पत्र लिहून देतें.

[ पडदा पडतो. ]

---

## प्रवेश दुसरा.

[ **स्थळः**—बिहारीच्या घरांतील दिवाणखाणा. दोन खुर्च्या एक टेबल
**पात्रेंः**-बिहारी, वृन्दा. ]

**वृंदाः**—आपल्या पायाशीं बसून हा वेश्यानाद सुटावा ह्मणून याचना करण्यांत मी प्रहरच्या प्रहर घालवले, रडण्यांतहि प्रहरच्या प्रहर दवडले, आपली रिझवणूक होईल ह्मणून नटण्यामुरडण्याचे बाह्यात्कारी प्रयोग करून पाहिले,

परंतु आपल्या या नादाचं वाढतं स्वरूप अधिक अधिक वाढूं लागलं. आतां मी करूं तरी काय ?

**विहारीः**—जें जें घडेल तें पहात स्वस्थ बैस.

**वृंदाः**—खरंच गडे मला निदान आनंदानं वागवायची. कधीं माझ्याबरोबर हसत खेळत नाही, कधीं मला बरोबर नेत नाही.

**विहारीः**—हो, बरी आठवण केलीस ( कपडे घालूं घालतो. ) मला निकडीच्या कामाकरितां बाहेर जायचं आहे.

**वृंदाः**—नाहीं जायचं. दिवसांतून एक तासभरहि माझ्याजवळ बसत नाहीं म्हणजे काय ? दुसऱ्यांचे नवरे कसे अगदीं गुळुगुळु बोलत असतात ! कोणतीहि का स्थिति असेना आनंदी जिणं हेंच साऱ्या सुखाचं रहाणं !

**विहारीः**—बरं कडी लावून घेऊन आंत बैस.

**वृंदाः**—मी आपल्याला मुळींच जाऊं द्यायची नाहीं. मला जरा जवळ घ्यायची नाहीं, कीं माझ्याकडे हंसत पाह्यचं नाहीं. मी तो शालू नेसायला आणूं कां ? मग आपण बरोबरच कुठं तरी जाऊं ! न्यायची ना मला ?

**विहारीः**—तुला ? तुला कसली फिरायला न्यायची ?

**वृंदाः**—मग काय कुणा वेश्येला घेऊन जायचं ? माझ्यापेक्षां ती अधिक सुंदर आहे वाटतं ? माझे गाल लाल नसतील, आणि तिचे गाल गुलाबपाण्याच्या निर्झरणीच असतील ? माझ्या ओठांत अमृत नसेल, आणि तिच्या बहुरस ओठावर हिंगुळी शराबच असेल नाहीं ? माझी सिहकटी नसेल आणि तिची कमर अगदीं पोटांतच असेल नाहीं ? गालांना गुलबहार लावला म्हणजे मी आपल्याला आवडेन का ? ओठांना अधरपूड लावली कीं मी गोड वाटेन का ! मी कोणता उपाय केला म्हणजे हा नाद सुटेल ?

**विहारीः**—वृंदे, हे सर्व उपाय अमलांत आणून तुझ्या मनांतून मला दुःख द्यायचं आहे का ? बायकांनीं कसं साळसूद असावं !

**वृंदाः**—आणि पुरुषांनीं मात्र चरचाल चाल-ढकल असावं ? मी आपल्याला नाहींच जाऊं द्यायची !

**विहारीः**—सोड म्हणतोना ! हो, उद्यां आपल्याला चित्रांगीच्या लग्नाला जायचं आहे ना ? मग कांहीं कापड चोपड खरेदी करायला नको का ?

**वृंदाः**—हो, खरंच. पण दुसरीकडे कुठं नाहीना जाणार ?

**विहारीः**—छेः ! तूं काय वेडी आहेस ? बरं मी पोषाख करून येतो ( पोषाख करण्याकरितां जातो. )

**वृंदाः**—( स्व. ) आर्य स्त्री या नात्यानं माझ्या पतीचे वेश्याचार अजिबात सुटण्याकरितां आणखी काय करूं ? प्रथम, केवळ चित्रांगी वर्गभगिनी ह्मणून तिच्याकडे जातां जातां, यांच्यावर मी प्रेम करूं लागले. नंतर हे वेश्याचारी आहेत असं समजून येतांच, यांचं लक्ष आपणाकडेच वेधावं ह्मणून चित्रांगीच्या सांगीवरून मी एका नायकिणीची मुलगी आहे अशी यांची समजुत करून दिली व ती आजवर कायम टिकविली, आणि त्यांतच त्यांचं प्रेम संपादन करून यांच्यांशीं लग्न केलं. कांहीं काळ ताळ्यावर आल्यासारखे दिसले. पण आतां त्या तात्पुरत्या प्रेमाचा रंग फिका पडला ह्मणूनच कीं काय, परत यांचं वेश्याक्रीडन सुरू झालं. पण आतां निराश होऊन काय उपयोग ? मी लग्नाची स्त्री या नात्यानं जे जे उपाय उपयोगांत आणावे लागतील ते ते मला केलेच पाहिजेत. पाहूं या. आतां माझी बालमैत्रीण चित्रांगी काय उपाय सुचविते ती ( रंगेल येतो ).

**रंगेलः**—( स्व. ) काय मारू पोरगी आहे. ( उ. ) आपलंच नांव वृंदा नाहीं का ? चित्रांगीनं आपल्याला हें पत्र दिलं आहे !

**वृंदाः**—( स्व. ) इकडच्या बद्दलची हकीगत चित्रेला कळविली होती त्याचंच हें उत्तर असावं. ( जाते. विहारी प्रवेश करतो )

**विहारीः**—( स्व. ) हा गृहस्थ कोण ? आणि तिच्या हातीं हें पत्र कसलं ? या गुलछबूनं प्रणयपत्रिका तर दिली नाहीं !

**रंगेलः**—आपण या लज्जावतीचे वडील कीं भाऊ ?

**विहारीः**—पहिल्याच धूळभेटीला चांगली ओळख करून दिलीत.

**रंगेलः**—ध्या सिगरेट बिगरेट कांहीं ध्या. आपली ही कन्या मोठी लाजाळू दिसते हां ! गालावरचे लज्जालेख रसिकाबिगर कुणालाही कळत नसतात. ती चहा घेऊन येणार कीं काय ?

**विहारीः**—अरे पण, आपण आहांत तरी कोण ?

**रंगेलः**—मी श्रीरंग Family चा दोस्त. माझं त्यांच्याकडे हरहमेश जाणं येणं असतं. स्नेह आंधळा असतो. त्याला कुठं शिरावं हें बिलकूल दिसत

नाहीं. प्रेमाला साऱ्या कुमारिकाच दिसतात. अहो इतकंच काय गरती व वेश्या यामधील फरकही प्रेमाला दिसत नाहीं.

**विहारीः**—( स्व. ) पाजी माणूस. वृंदेवर नजर ठेवून आला आहे.

**रंगेलः**—प्रेम जमायच्या आधीं प्रेम आंधळं असतं. पण पुढं पुढं तें इतकं डोळस बनतं कीं आजूबाजू सताड दिसल्यामुळं नवराहि नकोसा होतो.

**विहारीः**—( स्व. ) ह्मणजे वृंदेला मी आतां नकोसा झालों आहे तर ! पण हा कदाचित् सहजच पत्र घेऊन आला असेल, आणि मी मात्र उगाच वृंदेचा संशय घेत असेन. ( उघड ) तुह्मीं या प्रेमाच्या बाबतींत बराच अभ्यास केला आहेसं दिसतं.

**रंगेलः**—सर्व साधारण माणसापेक्षां प्रेमाच्या प्रदेशांत मी कांहीं जास्त मजली मारल्या नाहींत. पण प्रेम या विषयाची शास्त्रीय दृष्ट्या उभारणी करणं हें मी माझं ध्येय समजतों बरं तुह्मीं जाऊन तिला पाठवून देता का ?

**विहारीः**—( स्व. )काय मूर्ख आहे पहा. प्रत्यक्ष मला तिच्या नवऱ्याला जायला सांगतो आहे. आतां माझ्यासमोर यानं तिचा हात धरला नाहीं ह्मणजे मिळवली.

**रंगेलः**—तुह्माला बुवा बोलायला फार कमी पाहिजे. माणसांनं कसं सारखं बोलत असावं. आयुष्य अल्प असतं, आणि बोलण्यासारखं अनंत असतं. बोलतां बोलतांच बोला फुलाच्या गांठीं पडतात.

**विहारीः**—वृंदेची व तुमची ही पहिलीच भेट ना ?

**रंगेलः**—होय. नेहमी प्रेमाचा जन्म होत असतो तो प्रथमदर्शनीच होत असतो. आपण आतां बाहेरच जाणार असाल ?

**विहारीः**—( स्वगत ) याची चांगली बत्तिशी हलवल्याशिवाय भागणार नाहींसं दिसतं. अजून दम धरावा.

**रंगेलः**—तुह्मी अगदीं मुखस्तंभ दिसता ! तोंडल्यानं जीभ जड होत असते. अधरबिंबाच्या बेसुमार सेवनानं अगदीं बोलायचं विसरलेले दिसता. वृंदेवर माझं प्रेम आहे. तिचंहि माझ्यावर बसलं असेल. अशा स्थितींत तुम्हीं आमच्या प्रेमाला अवसर द्याल कीं नाहीं ? कीं तुमच्या कन्येला तुम्हीं कुमारिकाच ठेवणार आहांत ?

**विहारीः**—अहो छटेल ? वृन्दा माझी कोण आहे असं समजतां ?

**रंगेलः**—तुमची मुलगी. फार फार तर बहीण.

**विहारीः**—चटोर माणसा मी तिचा नवरा आहें.

**रंगेलः**—( स्व. ) अरे बापरे केवढा घोटाळा झाला. मी पहिल्यापासून अगदीं एकांगीच विचार करीत गेलों. हा तिचा नवरा ठरेल असं माझ्या स्वप्नीहि आलं नाहीं.

**विहारीः**—अरे शुंभा, असा आ करून काय पहातोस. ( सोटा उगारतो. वृन्दा येते. )

**वृंदाः**—हां खबरदार! हे माझे स्नेही आहेत.

**विहारीः**—वृन्दे, लग्नाच्या स्त्रियांना स्नेही ?

**वृंदाः**—पुरुष कुठ मैत्री जोडायला चुकतात? इष्ट ते लग्नाचे नियम पुरुष पाळीत नसले म्हणजे त्यांच्या बायकांनीं असे झुगारून दिले पाहिजेत.

**विहारीः**—वृन्दे, काय बोलतेस तूं ?

**वृंदाः**—दुसरं काय ? रंगेल माझे जिवलग मित्र आहेत.

**रंगेलः**—( स्व. ) झाली घायाळ. माझा तर्क अगदीं बरोबर. यांची लग्न-गांठ तुटायला झालेली दिसते. असो. अगदींच निराश व्हायला नको.

**विहारीः**—मित्रबित्र मी कांहीं जाणत नाहीं. रंगेल, मी हिचा पती आहे हें समजून घराबाहेर चला.

**वृंदाः**—पति हें लग्नानं दिलेलं स्त्रीधन.

**रंगेलः**—पण जिवलग मित्र ही निसर्गानं दिलेली देणगी.

**वृंदाः**—स्त्रीधन परस्त्रीकडे गहाण पडल्यावर स्त्रीयांनीं या देणगीशिवाय दुसऱ्या कुठ बरं जीव रमवावा ? या देणग्यांच्या जोरावर गहाणाचं स्त्रीधन सोडवावं लागतं तें हें अस्त्र ( रंगेलजवळ जाऊन उभी रहाते. )

**विहारीः**—अहो फक्कडराव, माझ्या घरांतून बाहेर चला.

**वृंदाः**—रंगेलराव, तुम्ही इथंच बसा, मला आज तुमच्याशीं मनसोक्त हसाखिदळायचं आहे.

**विहारीः**—जातां कीं घालवून देऊं ?

**वृंदाः**—बसता कीं खेचून बसवूं ?

**रंगेलः**—शरिरानं जातों आणि मनानं रहातों. म्हणजे दोघांचंहि ऐकल्यासारखं होईल ( जातो ).

**वृंदाः**—ठीक आहे त्यांना घालवून दिलंत तर मीहि निघालें.

**बिहारीः**—तू ढीग जाशील. पण मी जाऊं दिल पाहिजे ना.

**वृंदाः**—ही मी निघालेंच. इतकंच काय पण यापुढं चित्रांगीच्या लग्नांत सुद्धां मी माझ्या मित्राला घेऊन मिरवणार.

**बिहारीः**—मीही अशी चार चौघांत माझी बे अब्रू होऊं देणार नाहीं. मी तिथं असल्यावर पाहूं कसा तो येतो तो. धडधडीत नवऱ्याच्यासमोर मित्राबरोबर मिरवीन ह्मणतेस. शरम नाहीं वाटत ?

**वृंदाः**—वेश्येच्या नादांत वावरतांना असल्या शरमेचा तुह्मीं कधीं विचार केला आहे का ? मीहि जाणारच.

**बिहारीः**—पाहूं कशी जातेस ती. हा पहा, मी दरवाज्याशीं जाऊन बसतो. ( जातो. )

**वृंदाः**—( स्व. ) चित्रांगीनं पत्रांत सुचवलेली युक्ती अगदीं सोळा आणे लागू पडली. आतां या निमित्तानं तरी हे चोवीस तास माझ्याभोंवतीं घुटमळत रहाणार.

[ पडदा पडतो. ]

---

## प्रवेश तिसरा.

( **स्थळः**—रस्ता. रस्त्याला लागून बंगल्याचें फाटक.

**पात्रें**ः—कंगालराव, )

**कंगालः**—( स्व. ) टिपून घेतलेल्या पत्त्याप्रमाणें बरोबर आलों कीं नाहीं. आमच्या जानिवशाचा बंगला कोणता ( घड्याळ पाहून ) नऊ, साडे नऊ झाले ! हेमंत अजून कसा आला नाहीं ? पत्राप्रमाणें तो व मी एकदम यायला पाहिजे होतों. प्रत्यक्ष नवऱ्यामुलाचा मी चुलता–व्याही–असूनहि माझी वर्णी लावायला कोणीच इथं दिसत नाहीं. काय हें शहर ! जो दिसतो तो आपल्या अगदीं त्यांत ! कोंकणांतून पुतण्याच्या लग्नाच्या निमित्तानं स्वतःच लग्न उरकून घेण्यास आलो खरा, पण नवरदेवाचा अजून पत्ता नाहीं ! काय खुळा हेमंत ! अरे मी वयस्क असून माझ्या लग्नाचा नुसता चान्स मनांत योजून निघालों तों आधीं येऊन पोहोंचलों. पण हा हेमंत चांगला तरुण असून, लग्न निश्चित ठरलं असून अजून आला नाहीं ! काय म्हणावं याला ? व्यवहार नाहीं ! अरे,

स्वतःच्या लग्नासाठींसुद्धां चार दिवस फुरसतीनं येववत नाहीं! रस्त्यानं येतां येतां पांचपन्नास लगीन घरं लागलीं, पण त्यांत आमचं इष्टस्थळ कांहीं गावलं नाहीं. आतां इथच बसावं झालं ( छत्री मिटून तिच्यावर बसतो. जानू भांगऱ्या येतो )

**जानूः**—ओ म्हताऱ्यानु, कुटुन आलेव? जायाचं कुटं? ऐकलांव काय? जायाचं कुटं?

**कंगालः**—कोणरे तूं? तूं कोण?

**जानूः**—मी आपल्या, त्या, व्हयत्या बामनाचा गडी हाय! मिलतील त्या पावन्याह्नी घरी न्याया आलाय. तुमी लगीन लावाया आलेव काय? ( स्व. ) जल्ला एकदा म्होरा तां. बोलत बी न्हाय!

**कंगालः**—( स्व. ) या शहरांतून खिसेकापू, लफंगे लोक बरेच असतात असं ऐकतों. मी आपला व्यवहारी माणूस. दाद म्हणून लागू द्यायचा नाहीं.

**जानू**—वाचा बिचा गेली का काय? मगा धरना म्हनताय जायाचं कुटं तरी आपलां तांच! अव गिरीस्तानु तुम्हाला शिरीरंग दादाच्या घरीं जायचाय काय?

**कंगालः**—हो. हो. हो. हो. शिरीरंगाच्याच घरीं जायचय! वलाकलास, बराबर वलाकलास. पण कायरे, तुला त्यांनींच धाडलं होय?

**जानूः**—व्हय, मानसां चुकनील त्रिकतील म्हून शान मना म्होरं लावून दिलीन. हत नित्रणं करून काय बसताव.

**कंगालः**—श्रीरंगराव मोठे धोरणी दिसतात हं. वाः छान. असं व्यवहार-ज्ञान असावं. माणसानं कसं कुठंही नेमकं जावं. पण कायरे तूं इकडे रस्तबिस्ते चुकत नाहींस का?

**जानूः**—चुकतांच कशान? नायपर चुकताय मोप वकत चुकताय. इकडून जायचा तो थकडून जातांय, आनिक वाईच जातांय आनिक वाईच जातांय. अव म्हाताऱ्बुवानु मी हत आलांच नसतां. पर शिरीरंगदादानीं ह्यरीच घर काम कऱ्या आनलीन् मुलखातून. हे बघा मना येऊनशान निगुत धा दिस झाले.

**कंगालः**—पण लग्नमंडपाची गम्मत उडाली आहे कारे? गर्दी पुष्कळ झाली असेल. नक्षत्रमाळा, छत, हंड्या, झुंबरं वगैरे वगैरे अगदी केवढी तरी गम्मत झाली असेल नाहीं?

**जानूः**—तर, ह्यंव नी त्यॅव काय इचारुच नका.

**कंगालः**—मग उचल हें पाकिट–अलगज उचल हं. नाहीं तर दशम्या मोडतील (जानु पाकिटाचा वास घेतो) कारे, झुगश्याचा वास कसला घेतोस. असूं दे माझा आपला आंत, जानिवशाच्या घरीं उत्तम जागेवर खुंटीला अड-कवून ठेव हं, नाहींतर विटाळ होईल ( जानू जाऊं लागतो ) आणि हो, नवरा मुलगा म्हणजे आमचा पुतण्या हेमंत आला कां ?

**जानूः**—ह्ये मन ? ह्ये मन चंचळ मोटा. अहो तां मना काय ठावा ? नाय-तांच इचारतील ! आतां आपली वायशिशी फोड काढीन ( जाऊं लागतो )

**कंगालः**—पण कायरे मुलगीबिलगी कशी काय आहे ?

**जानूः**—तां काय इचारतांव ? तुमती इज. वयास काय, नि फुलां काय नू पाताल काय. बया, बया, बया, बया, आपल्या मुलकांत तसलां येक बी सोंग न्हाय. काय पर हाय !

**कंगालः**—घरांत आणखी कांहीं लग्नाच्या मुली आहेत कारे ?

**जानूः**—मोप जमल्यात. त्यांची येक म्यावणीच हाय लग्नाची. किती वरसां न्हाताय यवास ठावां. बरं आतां मना जाऊ द्या. यताव ना ?

**कंगालः**—तू जा पुढं. पाकीट नीट ठेव. हे समोरचंच घरना ? हो. पण तुझं नांव काय ?

**जानूः**—माजा नांव ? जानु भांगऱ्या. [ जानू जातो. ]

**कंगालः**—स्वतःची तिसरी बायको मरून दोन वर्षं झालीं. हा दोन वर्षांचा काळ दीड तपायेवढा भासतो आहे. व्यवहार चुकता नाहीं कामा. लग्न तर अवश्य उरकून घेतलं पाहिजे. स्वतःला जर मूल झालं नाहीं तर पै पैं करून मिळविलेली जिंदगी आयतीच हेमंतला मिळेल. व्यवहार चुकता कामा नाहीं. हेमंताला मिळणं हा व्यवहार नव्हे; पण आतां लग्नाचा बेत कसा काय जमायचा. पैसे रगड बरोबर आणले आहेत. ( सलकडी हातांत घालतो. ) दिसलं पाहिजे ना कांहींतरी ! एरवीं पोर कोण देतो. चारदोन माणसं हाताशीं धरलीं पाहिजेत. इकडे शहरांत मुली शिकलेल्या फार, पण त्या मानानं त्यांची द्रव्याकडील दृष्टी तितकीच व्यवहारी, असं मी ऐकतों निव्वळ संपत्तीकरितां आमच्यासारख्याशीं लग्न लावायला बेशक तयार होतात असं म्हणतात. पाहूं या जमलं तर. मला काय ? निव्वळ व्यवहार पाह्यचा. कुणीकडून स्वतःला मूल झाल्याशीं कारण. उंः बेश आहे. बायको कशी कां असेना ! कुरुप असो सुरूप असो. सोळा

वर्षाची असो. सहा वर्षांची असो. बावळी असो, सोवळी असो, कोवळी असो. निदान एक मुलगा झाला तरी वंश सुरु राहील. ( पत्रिकांचें पुडकें काढीत ) ज्या प्रकारच्या मुलीच्या पत्रिका येतील त्या प्रकारच्या पत्रिकेशीं जुळतील इतक्या प्रकारच्या पत्रिका करून घेतल्या. पण त्या आणल्या आहेत ना? असो. केवळ मुलीच्या बापांनां ३६ गूण जमले आहेत असं वाटावं ह्मणून या बनावट करून आणल्या आहेत. सनातन धर्म आहे. व्यवहार आहे. त्याचप्रमाणं इस्टेटीचीं हीं अंदाजपत्रकें. एखादा बाप हट्टच घेऊन बसला कीं सर्व इस्टेट मुलीच्या नांवानं करून द्या तरी ही आह्मी तयार आहोंत असं दाखविणारा हा कागद. फक्त सोडलेल्या या जागेंत मुलीच्या नांवाचा शब्द लिहायचा आणि घ्यायचा रजिस्टर करून. इतक्या तयारीनं आल्यावर लग्न होत नाहीं ह्मणजे काय गोष्ट आहे. ( रंगेल येतो. )

**रंगेलः**—( स्वगत ) हे गृहस्थ आपल्या मुलीच्या पत्रिका चाळताहेत वाटतं ( उघड ) नमस्कार! मला ओळखलंच असेल?

**कंगालः**—नमस्कार.

**रंगेलः**—तुमचा चेहरा मी पुष्कळ ठिकाणीं पाहिला आहे पहा. तुह्माला एक सुंदर मुलगी आहे नाहीं?

**कंगालः**—( स्वगत ) हा रांडेच्या! मी कोंकणांतून येऊण थोडा वेळ झाला नाहीं तोंच माझा चेहरा पुष्कळ ठिकाणीं यांनीं पाहिला कुठं? मला सुंदर मुलगी आहे ह्मणतो. आपलं काय जातं. आयतीच माझ्या नांवावर एक सुंदर मुलगी जमा होत आहे. शकून चांगला. ( उघड ) हो मला एक सुंदर मुलगी आहे. किती सुंदर आहे ह्मणून सांगूं. अशी कुठंच मिळणार नाहीं.

**रंगेलः**—मग आमची व तिची ओळख करून द्याना? कॉलेजमध्यें आहे नाहीं का?

**कंगाल;**—होय कालिजमध्यें. पण काय हो तिची फारशी चौकशी करतां? तुमचं लग्न बिग्न व्हायचं आहे कीं काय?

**रंगेलः**—ह्मणजे तुम्ही मला ओळखलंच नाहीं तर? अहो या शहरांत मी म्हणजे कुणाला माहीत नाहीं असं होणंच शक्य नाहीं. मी सगळ्यांना ओळखतो व सगळे मला ओळखतात. अहो वाटेल त्या स्त्री पुरुषाची माहिती माझ्या जिभेवर नाचते आहे. माझं नावच रंगेलराव.

**कंगालः**—अस्सं! बेश, छान, उत्तम. पण काय हो, या शहरांत लग्न होण्यालायक मुलींचा भरणा मोठा असेल नाहीं.

**रंगेलः**—( स्वगत ) म्हणजे हे गृहस्थ लग्नाच्या मुलींचीशी चौकशी करतात ? बेळ्याची बायको मेली असली पाहिजे, अगर कुणी नेलीतरी असली पाहिजे. ( उघड ) लग्नाच्या मुलीबद्दल तुम्हीं विचारलंत, नाहीं ? संध्याकाळीं पांचच्या सुमारास अस्ताव्यस्त पदर टाकून चाललेले तरुणींचे ताफे आणि फक्कडांचे फड तुम्हीं पाहिले नाहींत एकूण ? तुमच्या मुलींचं तुम्हीं केव्हां लग्न करणार ?

**कंगालः**—तिला योग्य वर प्राप्त झाला पाहिजेना ? रंगेलरावजी, तुम्हीं माझ्या मनाप्रमाणें माणूस भेटलांत. तुम्हाला वाईट वाटेल पण सांगतोच. माझी भार्या दोन वर्षांपूर्वी वारली.

**रंगेलः**—मग तुम्हाला लग्न कर्तव्य आहे एवढंच ना ?

**कंगालः**—होय, माझी पत्रिका सुद्धां माझ्याजवळ आहे पहा!

**रंगेलः**—पत्रिका काय चाटायची आहे. आजकाल, लग्नं या पत्रिकांनीं होत नाहींत, प्रणयपत्रिकांनीं होत असतात. धनुर्भंगांनीं होत नाहींत; भ्रूभंगांनीं होत असतात. नवरामुलगा पाहून होत नसतात, त्याची संपत्ती पाहून होत असतात. मी तुम्हाला योग्य माणूस भेटलों. आजपर्यंत मला स्वतःला कमींत कमी एक हजार प्रणयपत्रिका आल्या आहेत. त्यातून एखादीशी तुमचं ताबड-तोब देऊं जमवून. चला घरीं जाऊं. तुमची मुलगी घरीं भेटेल ना आतां ?

**कंगालः**—( स्वगत ) काय मौज आहे पहा. हा माझ्या काल्पनिक मुली-करितां झटतो आहे, तर मी माझ्या लग्नासाठीं याच्याशीं बिलगतोय (उघड) अहो माझी मुलगी तूर्त आहे आजोळीं. तिला मी लवकरच आणवणार आहे. तिचं व तुमचं लग्न बहुतेक जमणारच. हो. पण माझं लग्न आधीं जमवून द्या. पैसा वाटेल तो खर्च करूं.

**रंगेलः**—तुम्हाला सुंदर बायको पाहिजे ना ?

**कंगालः**—कुणीकडून बायको असली म्हणजे झालं. मात्र लवकर हं! मग माझी मुलगी तुम्हाला आहेच.

**रंगेलः**—You are wrong! चुकत आहांत! तुमच्या सारख्याला बायको सुंदरच पाहिजे. सुंदर बायको म्हणजे वाटेल तिथं जाण्याचा फ्री पास.

सुंदर बायकोचा नवरा ह्मणून वाटेल तो माणूस तुमचं कोडकौतुक पुरवील. आगगाडींत जा, बोटींत जा, ट्रॅममध्यें जा, सुंदर बायकोच्या जीवावर एकदां ती पहायला मिळावी ह्मणून वाटेल तो माणूस तुमची हिकमत चालवून घेईल. हें सुंदर बायकांचं युग आहे.

**कंगालः**—अहो तुह्माला व्यवहार नाहीं समजत. कुरूप बायको एकाची आणि सुंदर बायको * * * हा व्यवहार चुकतां कामा नये. रंगेलजी, माझा इथं चार दिवस मुक्काम आहे, तेवढ्या अवधींत झालं तर उत्तमच. आमचा एक पुतण्या आहे. त्याच्या लग्नाकरितां म्हणून इकडे आलों आहे याच लग्नांत जर माझंहि लग्न उरकेल तर काय बहार होईल.

**रंगेलः**—ह्मणजे श्रीरंगाकडे कीं काय ?

**कंगालः**—त्यांच्या जांवयाचा मी सख्खा चुलता. त्यांच्याकडेच आलों आहे.

**रंगेलः**—( स्वगत. ) मग यांची मुलगी ह्मणजे माल असली पाहिजे. ओळख होणार तर आणखी एका सुंदर स्त्रीशीं ( उघड ) श्रीरंगाकडे नाहीं का ?

**कंगालः**—तुह्मी त्यांचे नातेवाईक आहां कीं काय ?

**रंगेलः**—छेः छेः मुळींच नाहीं. फक्त त्यांच्या मुलीचं माझ्याशीं लग्न होत नाहीं याबद्दल वाईट वाटण्याइतकाच त्यांचा माझा संबंध.

**कंगालः**—कायहो, लग्नसमारंभांत पुष्कळ मुली जमतील, त्यांतून एखा-दीशीं माझं लग्न होईल कां हो ? म्हणजे शुभमंगलाची गर्दी ! त्यांतल्याच एखाद्या मुलीसमोर अंतरपट धरला कीं पुतण्याच्या मंगलाष्टकाच्या पोटांतच मीहि चतुर्भूज होईन.

**रंगेलः**—( स्वगत ) दांडगी कल्पनाशक्ती ! हा वेडा आहे कीं नीच आहे ? अचरट आहे कीं हपापलेला आहे ? कांहीं का असेना. आपलं काय जातं. कुणी-कडून आपल्याला याची मुलगी मिळाली कीं बस आहे. ( उघड ) तुमची युक्ती अजब आहे. एकदां शुभमंगल झालं कीं लग्न कायम.

**कंगालः**—पण कायहो, ते श्रीरंगशास्त्री सुधारक नाहींत ना ? हो, नाहीं तर लग्न झालंच नाहीं ह्मणायचे.

**रंगेलः**—छेः छेः तसं म्हणायचे नाहींत.

**कंगालः**—पुढचं पुढं ! व्यवहाराला डगमगणारा माणूस मी नव्हे. मग तुम्हीं असं करा. तुम्हाला मी माझी मुलगी दिल्याचं आतांच ठरवतों. तुम्हीं असं कराच. लग्नमंडपाचा हा डाव तडीस नेतानां अक्षता टाकून साक्षीदार होतील असे भट ठरवून ठेवा म्हणजे झालं. कधीं ? त्या दिवशीं लग्नमंडपांत.

**रंगेलः**—एवढंच ना ? तें माझं काम.

**कंगालः**—दक्षणा वाटेल तेवढी.

**रंगेलः**—पण माझा मात्र तुमच्या सुंदर मुलीशीं विवाह झाला पाहिजे हं !

**कंगालः**—तुम्हाला काळजी नको त्याची. हें लग्न उरकल्याबरोबर तें लग्न. मग तर झालं.

**रंगेलः**—तुमच्या मुलीचं माझ्यावर ताबडतोब प्रेम बसेल. कुमारिकांना घायाळ करणारा अशी माझी ख्याती आहे.

**कंगालः**—तुम्हीं दिसतां मोठे झकास हं ! तरुण माणसानं असं दिसावं. सर्व व्यवस्था करून ठेवा. एव्हांशी भटांच्या व्यवस्तेकरितां पैसे देऊन ठेवूं कां ?

**रंगेलः**—छेः हो कांहीं जरूरी नाहीं. मग येतो तर मी. ( रंगेल जातो. )

**कंगालः**—अहो ! पण एवढं कार्य उरकाच. ऐकलंत कां ? अहो जामात ? विसरूं नका हो. किती थोड्या वेळांत बेत जमला. या शहराची जर मला पूर्ण माहिती असती तर इकडचं राज्य तिकडं केलं असतं. याला म्हणावं व्यवहारज्ञान ! पण चलावं आतां उशीर झाला. ( जाऊं लागतो. हेमंत येतो. )

**हेमंतः**—काका, मला आशीर्वाद असावा ( पाया पडतो. कंगाल दुर्लक्ष करतो. ) काका, आयुष्यांतील एका पवित्रप्रसंगीं फुकाचा आशीर्वाद देण्यांतहि आपण उदासीन असावं ? मायेच्या आशीर्वादाला आम्हीं तरुणमाणसं हपापलेली असतो. मायेच्या बाबतींतील या हेमंताच्या दुर्दैवावर अशा मूकवृत्तीनं कळस चढवूं नका. आई नाहीं, बाप नाहीं, बहीण भाऊ नाहीं, अशा बिनमायेच्या उन्हाळ्यांत, अलाहाबादच्या निष्प्रेम प्रदेशांत आज इतकी हयात काढली. आणि आजच्याप्रसंगीं पहिल्याच भेटीला चुलता पुतण्याच्या नात्याचं हें प्रदर्शन. धन्य आहे तुमच्या महाराष्ट्राची ! काका, तुम्हाला मुलगा नाहीं म्हणून पुतण्याला आशीर्वादहि मिळूं नये होय ?

**कंगालः**—अरे बाबा, तसं नव्हे. तुझ्यासारख्या एम्. ए.ला कसला आशीर्वाद घ्यायचा हें आठवीत होतों. प्रकृती उत्तम दिसते आहे. ( दोन हमाल हेमंताचें सामान घेऊन येतात. )

**हेमंतः**—अरे तें सामान पलीकडच्या बंगल्यांत नेऊन ठेवा जा.

**कंगालः**—हेमू, कितीरे सामान हें. मला कांहीं कपडेबिपडे आणले आहेस कीं काय ? होय वाटतं ! आँ ?

**हेमंतः**—काका, तुमची कींव येते. हैराण परिस्थितींत आयुष्याशीं टक्कर देत असतांना तिजोरी बंद केलेल्या तुमच्या गंगाजळीचा एक थेंबहि मला दाखविलात ? स्थावर समाईक मिळकत माझे वडील इहलोक सोडतांक्षणींच हातोहात गिळंकृत करून फिरून द्रव्यानं धुतला हात माझ्यासमोर पसरायची तुमची नेहमीच तयारी असावी ? पैसे पाठीव म्हणून मला पत्रावर पत्रं धाडतां ? तुम्ही मला पाठवायचे कीं मी तुम्हाला ? माझ्या लग्नाबाबत चुलता म्हणून परस्पर हुंडा पिळून काढायचाहि तुमचा यत्न चालला होता. हें सर्व माझ्या कानीं आल्यापासून काका, खरोखरच तुमची कींव येते. आज मंगलप्रसंगीं मी इतकं बोलूं नये, पण तुम्हीच वेळ आणलीत.

**कंगालः**—ही हुंड्याची गोष्ट तुला श्रीरंगानं पत्रानं कळविली असेल ? काय लोक खोटंनाटं लिहितात ! घसमुसळे !

**हेमंतः**—माझे आपण एकुलतेएक चुलते म्हणून लग्नाच्या बाबतींत वडीलकींचा मान आपल्याला दिला. आपण निदान आलांत हें माझं थोर भाग्य. काका, आपल्या सुनबाईच्या अंगावर स्वतःचे असे कांही ठळक दागिने घालणार कीं नाहीं ? बरोबर आणले आहेत ना ?

**कंगालः**—दागिने ? मीरे बाबा कुठून घालणार ?

**हेमंतः**—बरं. निदान लोकलज्जेकरितां चांगला अहेर तरी ?

**कंगाल**—अहेर ? मी कुठून आणू बाबा. मी आणू कुठून ?

**हेमंतः**—काका, ती हातांतली सलकडीं तितक्या किमतीची खास भरतील.

**कंगालः**—अरे तीं लग्नांत म्हणून घालायला उसनी आणली आहेत एकाची.

**हेमंतः**—हालांतून डोकं वर काढणाऱ्या पुतण्याकरितां एक छदामाचीहि तसनस लागून घ्यायची नसेल तर तसं व्रत खुशाल चालवा, पण हें लालसेचं

असत्य भाषण मात्र ऐकूवूं नका. लहानपणांतील बगडे जीव हे आयुष्याचे मालिक असतात व तरुण दशेच्या आटोक्यांत आल्यावर आयुष्याची गहाण जिनगानी बनावं लागतं. पण तुमच्यासारखे उतारवयाचे विक्षिप्त म्हणजे आयुष्याच्या मोडक्यातोडक्या समाजाचा ढिगारा हेंच खरं !

**कंगालः**—हेमंत, तू असं कर, आणलेल्या लगीनसराईतून कांहीं पाटाव दागिने माझ्याजवळ देऊन ठेव. तेंच मी अहेर म्हणून पुढं करण्यांत लग्नमंडप साजरा करीन. अरे, माझा रुमाल तरी बघ किती ओंगळ दिसतो आहे तों. जसं कांहीं उमाबाईचं उभं लावणंच. एक नवा तरी घेऊन दे. अरे, कसं झालं तरी मी तुझा चुलता ना ?

**हेमंतः**—तसं नसतं तर फार बरं झालं असतं.

**कंगालः**—पोरा, तुझा बापही असं बोलका नसता.

**हेमंतः**—तुमच्या अनुभवानं या बाबतींत मला बापसे बेटा सवाई केलं आहे.

**कंगालः**—( स्वगत ) डांबीस पोरगा निघाला अगदीं. ( उघड ) हेमंत ही सलकडीं तुझ्या डोळयांत सलत असतील तर घे एकदा. आताच घालतो. धर ( सलकडी काढूं लागतो ).

**हेमंतः**—छेः छेः असल्या निर्ममत्वाच्या सुवर्ण सलकड्यांनीं चुलता पुतण्याच्या नात्यांत मी माझा हात गुंतवू इच्छीत नाहीं. आज माझ्या आंतड्याची माणसं असती तर तारुण्याचा शृंगारप्रदेश फुलबहारनं दरवळून सोडणाऱ्या लग्नाच्या शुभ दिवसानीं मंगल प्रेमानं तजेला आला असता. जाऊं द्या.

**कंगालः**—बरं, मी बंगल्यांतच जातो आतां. तुझ्याजवळ बोलण्यांत हंशील नाहीं. काय व्यवस्था झाली आहे कीं नाहीं कोणजाणे ! तूंही चल. दमला भागला असशील ! स्नान करून जरा पोटांत चार घांस टाकल्यावर बरं वाटेल.

**हेमंतः**—आलोंच मी ( कंगाल जातो ) यावेळीं माझ्या वडिलांची मूर्ती माझ्या डोळयासमोर दिसते आहे. दैवामुळं अदृष्टाच्या पडद्यामागं गडप झालेल्या गोष्टी प्रसंगवशात् अंतर्चक्षूच्या पाहुणचाराला हजर होत असतात. भूमीच्या खोल हृदयांत निजून रहाणारीं फुलं दिवसानुदिवस वेलीवर येऊन आत्म्याप्रमाणं तळपूं लागतात, गगन गव्हारांत स्तिमित असणारे तारे रोज रोज नव्यानव्यानं निदर्शनास येतात, परंतु माझ्या बाबांसारखी माणसें फिरून एकदां केव्हां अवतरणार कोणजाणे ! ( चित्रांगी व कल्याणी येतात )

**चित्रांगी**:—अग चल लौकर.

**कल्याणी**:—एव्हांना तिकडल्या वाटेनं गेलोंसुद्धां असतों.

**चित्रांगी**:—अग पण तिकडे गर्दी आहे ना ?

**कल्याणी**:—अग खुळे तो नव्हे बंगला. हा. तू मुद्दामच इकडून आलीस

**चित्रांगी**:—हो मुद्दामच आलें. मला मिरवायचं आहे बरं का ?

**कल्याणी**:—अग केवढ्यानीं बोलतेस !

**चित्रांगी**:—मग चल लौकर ! ( तिला ओढीत नेते तोंच डोकींतला गजरा पडतो. हेमंताकडे दोघी पाहून पुढं जातात. )

**हेमंत**:—अहो. तुमचा गजरा पडला. ( चित्रांगी परत येते )

**चित्रांगी**:—अगबाई, मला भान सुद्धा नाहीं. द्या कीं, तेवढा उचलून.

**हेमंत**:—यत्किंचित तुमचा गजरा ! मी काय म्हणून उचलून द्यावा.

**चित्रांगी**:—स्त्रीदाक्षिण्याची कांहीं कल्पना आहे कीं नाहीं ? ( उचलून घेते. जाते. )

**हेमंत**:—माझा स्वाभिमान इतका नेभळा नाहीं. ( स्वगत ) आजपर्यंत मराठी कादंबऱ्यातून व नाटकांतून मी महाराष्ट्रसमाज पहात होतों. प्रत्यक्ष ही चित्रं त्याच्याशीं तोलून पाहतां तीं किती अठराव्या शतकांतली वाटतात ! आजवेरीं अलाहाबादला राहिल्याकारणानं महाराष्ट्राकडे तिऱ्हाईत नजरेनं पहाण्याचा मला आयताच सुयोग आला आहे. माझ्या स्वतःच्या लग्नमंडपांत महाराष्ट्रसमाजाचं उत्कृष्ट निरीक्षण करतां येणार आहे. स्त्रीदाक्षिण्य म्हणजे स्त्रियांच्या पुरुषांवरील जुलमाचा इतिहास, अशी जी माझी प्रामाणिक समजूत आहे ती त्या मुलीनं सिद्ध करून दाखविली. स्त्रीला फाजील महत्त्व देण्याचा दुबळ्या लोकांनीं परिपाठ पाडल्यापासून चढून जाऊन, स्त्री ही पुरुषांवर मानसीक जुलूम करूं लागली. स्त्रीदाक्षिण्याच्या गूढ नांवाखालीं वाटेल त्या विचारांची लपवणूक करण्याचे वृथा रूढाचार पुरुषार्थाला एका काळीं गिळून टाकतील अशी माझी खात्री पटत चालली आहे. तारुण्याचं एकाकी काव्य किती मोहक असतं. जशी काय गोड हुरहुर—पण पुढं ते स्त्रीच्या बेचतुर सहवासांत कंकणाच्या नादांवर आपटून फुटून जातं. कवितेचे जास्त असे कळपे दिसण्याचं कारण हेंच ( जानू येतो )

**जानू**:—अव खोतानू. थकडं बंगल्यांत साद घालतायत !

**हेमंतः**—काय ह्मणतोस ?

**जानूः**—हेरीच तरास काय घेतांव ? घरांत चला.

**हेमंतः**—( स्व. ) ही काय भाषा बोलतो आहे कोण जाणे ( उ. ) घरीं येऊं ? चल हो पुढं.

**जानूः**— मंग हतं सडकेत काय उभं ऱ्हातांव ?

**हेमंतः**—खरं बुवा ! उत्तम धडा शिकवलास. ( जातात. )

---

## प्रवेश चवथा.

( स्थळः—श्रीरंगाच्या घरामागील बाग. )

( पात्रेंः—शिशीर, चित्रांगी, कल्याणी, हेमंत. )

**शिशीरः**—( स्व. ) ज्याच्यावर प्रेम केलं जावं त्याच्यावर केलं जात नाहीं ही तर प्रेमाची खरी Tragedy आणि जगाच्या रंगभूमीवर अनंत कालापासून हेंच नाटक सुरू आहे. पांच वर्षांपूर्वी कल्याणीनं माझा प्रेमभंग केला ह्मणून केवळ मरण्याकरितां मेसॉपोटेमियांत गेलों. अखेर जिवंत परत यावं लागलं ! कल्याणी, प्रेममय शिपायांचा हा शिलेदार भावनेच्या घोड्यावर स्वार होऊन तूं पायांनीं पूनीत केलेल्या प्रदेशांत चालून आला आहे.

( कल्याणी व चित्रांगी येतात. )

**चित्रांगीः**—काका, तुह्मी केव्हां आलांत ? आह्मींतर आतांच घरांतून आलों.

**शिशीरः**—सामान सुमान ठेवलं, थोडा चहा घेतला. वयनीनीं करून दिला. आणि तडक इकडे आलों आणि बगिच्यांत येऊन बसलों तोंच......

**चित्रांगीः**—लवंगेची विडी तोडतांना बारा वर्षांची मुलगीहि लाजणार नाहीं इतके तुह्मीं मावशीला लाजता ? काका, तुम्हीं मिलिटरी माणूसना ?

**कल्याणीः**—मिलिटरी माणूस खरे. पण स्त्रीजातीबद्दल फाजील गौरव बाळगण्याचं पर्यवसान यांचं हृदय स्त्रैण बनण्यांत झालं आहे समजलीस ! शिशीर तुमची प्रकृति उत्तम बनली आहे. जसा कांहीं खाकी पुतळा. हीं इतकीं पदकं कसलीं ?

**शिशीरः**—हें माझ्या मर्दुमकीचं अथवा भेकड वृत्तीचं द्योतक आहे. मी मरण्याकरितां किती हपापलों आहें हें तुला माहीतच आहे. लढण्याकरितां

आघाडीवर जावं, हातापायांत गोळ्या शिराव्या परंतु मरण येऊं नये असं कित्येक वर्षे चाललं. हल्लींच्या गोळ्याच वाईट. माणसाला ठार करण्याच्य बाबतीत तेवढ्या अचूक निरुपयोगी.

**चित्रांगीः**—पण मग पदकं मिळालेले लोक भेकड कसे ?

**कल्याणीः**—अग, परत आलेल्या लोकांना पदकं मिळतात. मर्द असेल तो लढाईत मेलाच पाहिजे, म्हणून परत जिवंत आलेले लोक ते भेकडच असले पाहिजेत. हे बिल्ले म्हणजे भेकडपणाचीं पारितोषकं आहेत.

**शिशीरः**—चित्रे, तुझ्या लग्नाबाबद तुला काय देऊं ?

**चित्रांगीः**—आचरटपणा सोडून द्यायचं वचन द्या म्हणजे झालं.

**कल्याणीः**—अथवा माझ्यासारख्या स्त्रीसाठीं वेडेचार करण्याची संवय लाजाहोमांत जाळून खाक करा—

**शिशीरः**—एकूण आपल्या लाजाहोमाची वेळ तूं जवळ आणणार ? चित्रे, बाळ तूं जरा दुसरीकडे जा.

**चित्रांगीः**—उं. Love scene करायचा आहे वाटतं ? मग आपण तर मुळींच जात नाहीं. खऱ्या सृष्टींतलं प्रेमाचं चित्र मला तरी एकदा पाहूं दे. हं, होऊं द्या सुरवात. शिशीरकाका, द्या कल्याणीच्या हातांत हात.

**कल्याणीः**—हृदय वश असेल तरच हातांत हात देणार—

**चित्रांगीः**—आणि डोकं जर तरतरीत असेल तरच हात चालणार—

**शिशीरः**—आणि बाहेरचं जग आंधळं असलं तरच हाताला हात चलाखी सुचणार. कल्याणी, माझं हृदय—

**कल्याणीः**—हो. हो. हो. हृदय अगदीं पंजांत घेऊन आल्यासारखे दिसतां ?

**शिशीरः**—बाळ चित्रे, जातेस ना. कल्याणी, तुझ्या प्रेमावांचून मी मरूं पहात आहे.

**चित्रांगी**—अतिशयोक्ति ही प्रेमाची सर्वमान्य भाषा आहे म्हणा.

**कल्याणीः**—शिशीर, इतक्या वर्षांनंतर तुम्हाला रुकार देणं म्हणजे शोक-पर्यवसायी नाटकाला हास्यरसाचा सहावा अंक जोडण्याइतकच हास्यास्पद नाहीं का होणार ?

**चित्रांगी**—भलतीच पंचाइत ही !

**शिशीरः**—ही पंचाईत तुला कशाला ? वास्तविक तूं इथून निघून जायचं कीं नाहीं.

**चित्रांगीः**—मी इथून गेलें की प्रेमाचा प्रळयकाल आलाच. काका, आतां तरी हा प्रेमाचा बाजार बंद करा. मावशीची खुशी–तिला नाहीं तुमच्याशीं लग्न लावायचं. या प्रेमाच्या दारधरणीनं प्रणयदेवता गुदमरून जायची. काका, असल्या पुरुषांना आम्ही बायका हंसतों, त्यांचा तिटकारा करतों. असल्या पुरुषांना काय म्हणतात, माहीत आहे का ? त्यांचं नांव "तरुणीकंटक."

**शिशीरः**—असलीं नांवें टिकल्या ठेवून काव्यानं काटा निघणार नाहीं समजलीस. चित्रे, तुझ्या लग्नाकरितां मी इतक्या दुरून आलों तो तुझ्याकडून कल्याणीच्या व माझ्या प्रणयप्रवेशांत मनोभंग करून घ्यायला का ? तुझ्या माझ्या वयांत फारसं अंतर नसलं तरी मी तुझा चुलता ना ? माझ्या प्रेमाची अशी चेष्टा करूं नको. प्रेमाची चेष्टा करण्यांत तूं स्त्रीचीहि चेष्टा करीत आहेस. स्त्री म्हणजे परमेश्वराच्या उधळ हाताची देणगी आहे. तोंडांत अमृताची चूळ घेऊन पुष्पराशीवर बसल्या बसल्या, मदिरेकडे पहात पहात, परमेश्वरानं स्त्रीजात निर्माण केली आहे.

**कल्याणीः**—चित्रे, खास स्त्रियांच्या स्तुतीस्तोत्राकरितां तयार केलेला यांच्या जिभेचा हमरस्ता अशानं सुधारणार नाहीं. आजकाल जिकडे पहावं तो तरुणांना स्त्रीजातीच्या भोंवती लाळ घोटण्याशिवाय दुसरं ध्येयच उरलं नाहींसं दिसतं.

**चित्रांगीः**—अग, याचं नांव उत्क्रांती. मानवतेला पहिल्यानं बेडकाची अवस्था प्राप्त झाली व नंतर वानरशाखेत तिचं संक्रमण झालं. पण आजकालच्या स्त्रीयुगांत वांकडी नजर भागवून घेण्याकरितां व स्त्री दिसली कीं कावकाव करण्याकरितां पुरुषानां कावळे बनावं लागलं आहे समजलीस.

**शिशीरः**—मग एकंदरींत मी इथून कल्याणीशीं गुपीत बोलल्याशिवाय जाऊं ना ? " दरिद्री चले दर्याकु, कर्म चले साथ." ( जाऊं लागतो. )

**चित्रांगीः**—इतक्या आततताईवर नको यायला. मीच जातें कशी ( जाते.)

**शिशीरः**—( स्व. ) अर्रर्र. चित्रांगी इथ होती तेंच बरं होतं. आतां इच्याशीं कोणत्या तऱ्हेनं बोलायला सुरुवात करूं ? इच्याकरितां माझं हृदय किती तडफडतं आहे हें हिला कसं समजावूं ?



**कल्याणीः**—हं हं हं ! जवळ येऊं नका !

पृ. ३२

**कल्याणीः**—का बिलेबहादर, असे मुके कां?

**शिशीरः**—जे आपल्याला मिळावंस वाटतं तें लाभत नसल्यावर कल्पनेंत तद्रूप होऊन जाण्याशिवाय दुसरा इलाज काय? कल्याणी, आज मी शेवटची प्रेमयाचना करणार आहे.

**कल्याणीः**—पूर्वी तुह्मी याच शब्दांनीं शेवटची याचना केली होती.

**शिशीरः**—पण आतां आपण तितक्याच वर्षांनीं मोठीं नाहीं का झालों?

**कल्याणीः**—ह्मातारे होईपर्यंत असेंच मोठे होत जाणार. ह्मातारपणापर्यंत अशीच का प्रेमयाचना करीत रहाणार?

**शिशीरः**—तसं मी कां समजूं? ज्या एकनिष्ठपणानं मी तुझ्यावर प्रेम करीत आलों त्या एकनिष्ठपणान मी हें जगहि मुठींत आणू शकेन.

**कल्याणीः**—तुमच्या एकनिष्ठतेची मात्र मला धन्यता वाटते.

**शिशीरः**—( जवळ जाऊन ) मग-मग-कल्याणी तुझ्या नकारांतील गुपित तरी काय आहे?

**कल्याणीः**—हां. हां. जवळ येऊं नका ( तो मागं सरतो ) शिशीर तुह्माला काय कुमारिका थोड्या आहेत? आयुष्याला पुरेसा पैसा मिळविण्याची पात्रता अंगात आल्याशिवाय मी लग्नच करणार नाहीं.

**शिशीरः**—लग्न न करण्याचं कारण तू सांगतेस हें अगदींच गौण आहे. आर्थिक जबाबदारी पुरुषांच्या शिरीं असल्यावर लग्न न करण्याचं हें कारण अगदींच त्याज्य दिसतं.

**कल्याणीः**—पुरुषांच्या शिरावर संसाराची जबाबदारी! नाहीं? दारूबाज निघालेल्या नवऱ्यांच्या बायकांनां, व्यसनांत संसाराची रांगोळी करणाऱ्या नवऱ्याच्या बायकांनां, अगर अकारण नवऱ्यांनीं टाकलेल्या बायकांना, हातीं पोळपाट लाटणं घेऊन समाजाच्या पोळया भाकऱ्या भाजाव्या लागतात. असल्या भावी प्रसंगांना तोंड देण्याकरितां प्रत्येक कुमारिकेनं कोणत्यातरी जातीचं शिक्षण घेऊन तयार झाल्यावर मगच लग्नाला तयार व्हावं. माझ्या हातून तसला शिक्षणक्रम पुरा होईपर्यंत मी लग्नच करणार नाहीं.

**शिशीरः**—तूं चतूर आहेस, सुंदर आहेस, विद्वान आहेस!

**कल्याणीः**—तुह्मी अडाणी आहां, कुरूप आहा, मूर्ख आहां. पुरुष जसे असतात तसेच मी त्यांना पहातें. तुह्मीं जसे दिसतां तसे मला दिसत नसून

जसे आहा तसेच मला दिसता. माझ्या ठायीं स्वाभिमान आहे. माझ्या सौंदर्याची, सदभिरुचीची मला जाणीव आहे. माझ्या स्त्रीस्वातंत्र्याबद्दल मला अभिमान वाटत असून परावलंबित सुखाची मला काहीचीहि अपेक्षा नाहीं. घरभर तंबाकूची घाण करून जिकडे तिकडे नवरेगिरीचा बाजार पसरविणाऱ्या पुरुष सहचराचा मला किळस येतो.

**शिशीरः**—पण प्रेमाच्या प्रांगणांत—

**कल्याणीः**—प्रेम ? तुमची विचारग्रंथी इतकी सुतात असते कीं पुढचं वाक्य बेशक पुरं करावं. माझं प्रेम साधूवर, विभूतीवर व देवादिकांवर आहे. कुमारिका व अपत्यहीनस्त्रीचा, परमेश्वर हाच पती आणि हाच मुलगा.

**शिशीरः**—( जवळ जाऊन ) म्हणजे तुला मुलं व्हावीशीं वाटत नाहीं का ?

**कल्याणीः**—आचरटपणाची आणखी कमाल करूं नका. होय, मला मुलं होऊन मी मातृपदावर चढावंसं मला वाटतं. पण घरांत नवरा असल्याशिवाय मुलं असलेलीं चालत नाहीं असं माझा धर्म मला सांगतो, यामुळंच स्त्री असून माता न होण्याचं तूर्त मी पत्करलं आहे.

**शिशीरः**—कल्याणी तुझी अमर्यादा करतों म्हणून रागावूं नकोस, पण हे विचार आर्यस्त्रीला विशोभित दिसतात.

**कल्याणीः**—यामुळंच मी हें कुणाजवळ बोलून दाखवीत नाहीं. लग्नाला दिलेला नकार न ऐकून स्वस्थ न बसणाऱ्याजवळ मात्र हें मला सांगावं लागतं.

**शिशीरः**—हा विषयच काढला ही माझी चुकी झाली. स्वतःच्या बाबतींत एक शब्दही काढणार नाहीं. ( चित्रांगी येते. )

**चित्रांगीः**—काका, अगदीं Hopeless ( निराश ) झालेले दिसतां. एवढं काय घेऊन बसलांत मावशीला ? नाहींतर नाहीं !

**शिशीरः**—नाहीं हें ठरलंच आतां ( स्व. ) ही कारटी मला चिडवायला इथं हजर ( जातो. )

**चित्रांगीः**—किती निष्पाप मनाचा माणूस. माथ्यानं जरा ढिला म्हणून.

**कल्याणीः**—माथ्यानं जर ढिले नसते तर मेस्पॉटला जातांच आलं नसतं. सैन्यखात्यांत बुद्धीनं हुशार माणूस बिलकूल खपत नाही.

**चित्रांगीः**—मावशी, मी तुला खरंच विचारतें कीं, काकांच्यावर तूं खराच अनुग्रह करणार नाहींस ?

**कल्याणीः**—मी स्वावलंबनी झाल्यावर त्याचा विचार. तिथपर्यंत यांचं जर माझ्याबद्दलचं ब्रह्मवेड कायम असेल तर तेंहि होणार नाहीं.

**चित्रांगीः**—तुझी तूं मुखत्यारीण आहेस, पण निव्वळ दया ह्मणून काकांना आत्मदानाचा धर्म कर.

**कल्याणीः**—कां स्वतःचं लग्न ही समाधानाला पुरेशी जागा नाहीं वाटतं?

**चित्रांगीः**—अग मी तर लग्न करणारच आहे. पण मावशी तुझीं तत्त्वं मोठीं गोंडस. तुझ्या तत्त्वामुळं लग्न करायचं नसतांही अशा Lovescenesना अवसर भरपूर! लग्न व्हावयाचं माझं आणि Love scenes चालले आहेत तुझे.

**कल्याणीः**—कां? अग फोटोशीं शृंगार करण्यापेक्षां स्वतःशीच केलेले बरे! कपाटांत फोटो आहेना हेमंतरावांचा? खरं सांग हां. दिवसांतून किती वेळां तो फोटो घेऊन बसतेस?

**चित्रांगीः**—आणखी काय काय विचारायचं आहे! मी काय काय करतें तें ऐकून तुला काय करायचं. वृद्ध होइतो कुमारिका रहाण्याचा तुझा निश्चय.

**कल्याणीः**—कदाचित तो बदलेलही. कल्पनेंत आकार घेणारा माझा सहचर जर सत्यसृष्टींत उतरला तर—

**चित्रांगीः**—तूं त्याच्याशीं विवाह करणार? आणि बाबांनीं आक्षेप घेतल तर?

**कल्याणीः**—मी त्यांचंहि ऐकणार नाहीं.

**चित्रांगीः**—ह्मणजे तूं माझ्या बाबांचा अपमान करणार तर! ह्मणजे पर्यायानं माझाहि अपमान करणार.

**कल्याणीः**—किती Head strong आहेसग तूं. तुझा अपमान हेमंतरावांनीं केला तरीहि तूं त्यांच्याशीं अशीच वागशील.

**चित्रांगीः**—यांत काय संशय?

**कल्याणीः**—समज, हेमंतराव एकदम इथं आले आणि त्यांनीं तुझा असभ्यतेनं अपमान केला तर?

**चित्रांगीः**—"जिच्याशीं तुमचं लग्न ठरलं ती मी नव्हे" असं मी त्यांना सांगेन. ( हेमंत येतो. )

**हेमंतः**—( स्वगत ) मघाशीं मला रस्त्यांत भेटल्या त्या ह्याच मुली (उघड) हा बगीचा श्रीरंगरावांचाच ना?

**चित्रांगीः**—हो त्यांचाच बगीचा. मघाशीं आम्हांला रस्त्यांत भेटला ते तुम्हीच नव्हे का?

**हेमंतः**—होय मीच तो. आणि तुम्हीहि त्याच नव्हे का?

**चित्रांगी:**—हो त्याच बरं! आपलं नांव काय?

**हेमंतः**—माझं नांव आपल्याला ठाऊक व्हावें असा कांहीं मी मोठा श्रीमंत माणूस नाहीं.

**चित्रांगीः**—तरी पण या गरीब लहान माणसाचं नांव सांगा.

**हेमंतः**—पुरुषाकडून जबरीनं स्त्रीदाक्षिण्याची अपेक्षा करणाऱ्या स्त्रीला नांव सांगण्याची माझी मुळीच इच्छा नाही. आजकालच्या तारुण्यदृष्टिला स्त्रीकडून आपलं नांव विचारलं जाणं हा एक प्रेमविजय आहे असं वाटतं. पण मी जरा भावशून्य माणूस आहें.

**कल्याणीः**—आपण हेमंतरावांचे स्नेही आहा काय? त्यांच्या लग्नाकरितां आलां होय?

**हेमंतः**—मीच हेमंतराव ( स्व. ) खोटं बोलण्याचा मोह पाडण्याइतका गमतीदार प्रश्न तिनं विचारला. दोघीही लाजल्यासारख्या दिसतात. जसं काय माझं लग्न या दोघींशीं व्हायचं आहे. ( उघड ) या दोघींपैकी श्रीरंगरावांची मुलगी कोणती?

**चित्रांगीः**—( कल्याणीकडे बोट दाखवून ) ही. स्वरूपानं फार सुंदर आहे नाहीं?

**कल्याणीः**—किती अविचारी आहेस ग! ( स्व. ) आतां काय करावं! आपण आतां उठून जावं हें जास्त सभ्यपणाचं होईल. तिनं केलेला मूर्खपणा तिनंच निस्तरला पाहिजे. पण माझ्या जाण्याचा अर्थ मी लाजून गेलें असा होऊन त्यांचा ग्रह जास्त बळकट तर नाहींना होणार? कसंही असो. गेलं हें पाहिजेच. ( जाते. )

**चित्रांगीः**—याना इकडे. बसा ह्या बाकावर ( स्व. ) आल्या संधीचा फायदा घेऊन चांगलीच वरपरिक्षा केली पाहिजे. ( उघड ) बसाना.

**हेमंतः**—तशी कांहीं अवश्यकता मला वाटत नाहीं.

**चित्रांगीः**—कां? मला बुजावलांत होय?

**हेमंतः**—नाहीं. तुझ्या वागणुकीबद्दल जरा विचार करीत फिरावसं वाटतं. ( जाऊं लागतो )

**चित्रांगीः**—( त्याला अडवून ) इतक्यांतच तिची आठपाठ करायला नको. शुभमंगलापूर्वी तिला जरा सुखानं फिरूं द्या ( हेमंत परत फिरतो ).

**हेमंतः**—( स्व. ) आतां निघून गेलों तर या मुलीला वाटेल कीं मी एव्हां-पासूनच बाईलवेडा बनलों. बरं न जावं तर परक्या मुलीशीं एकटं बोलत बसणं मला प्रशस्त वाटत नाहीं ( उघड ) का तिची फारशी काळजी वाहता ? तिची पाठराखीण होण्याचा मान हस्तगत झाला आहे वाटतं ?

**चित्रांगीः**—नाहीं ! पण परतसे फिरलेत ? मी इथं एकटी, अशा स्थितीत उभं रहाणं सभ्यपणाला सोडून आहे, या शिस्तीचा समावेश तुमच्या शिष्टा-चारांत नाहीं वाटतं ?

**हेमंतः**—मुली या तुझ्या विचित्रपणाचा अर्थ तरी काय ? मघांशी जाऊं लागलों तर एखाद्या प्रणयिनीप्रमाणं मला मागं फिरवलंस, आतां परत आलों तों मारकया म्हशीप्रमाणं शिंगाचा मारा सुरु केलास. दोघींच्याहि माऱ्याची तऱ्हा एकच. एक शेपटी उचलून शिंगाचा उपयोग करते तर दुसरी भिवया वर चढवून बुद्धीचा उपयोग करते.

**चित्रांगीः**—गेली का आतां माझ्या भिवयाकडे नजर ? भिवयांवरून आतां नजरेशीं भिडली असेल, नजरेवरून नाकावर, नाकावरून गालाकडे, गालांचा गुलाबी प्रवास संपतो न संपतो तोंच शब्दांची चाल ओठांवर स्थीर होते. खरं सांगा हां एवढा सारा प्रवास मनांतल्या मनांत उरकलांत की नाहीं ?

**हेमंतः**—( स्व. ) ही मुलगी बेशरम तरी असावी अगर पुरुषाच्या वृत्तीनं तिला दुराग्रही तरी बनवलं असावं. स्त्रीबद्दलचा माझ्याहि दुराग्रहाचा इला मासला दाखवावा. ( उघड ) तूं म्हणतेस त्याच्या उलट प्रकार घडला. माझी दृष्टी तुझ्या कुंकुमावर गेली होती हल्लींच्या बायका कुंकू इतकं लहान लावतात कीं, त्यांच्या शून्यमय सौभाग्याचा आढावा कुणीहि ताबडतोब काढावा. ही गोष्ट तुझ्या हातांत आरसा दिला असता तेव्हांच नजरेस येइल.

**चित्रांगीः**—माझ्या सौभाग्याचा लेख समोर उभा असल्याप्रमाणें मला दिसतो आहे. त्याला आरसाच नको ! तुमच्या पत्नीनं कपाळभर लाल मळवट भरून दर क्षणाला सती जाण्याची तयारी करून ठेवली पाहिजे असं तुम्हाला

वाटतं तर ? बाई, बाई, बाई, लहान कुंकवावर एवढा कटाक्ष ठेवणारे जेजुरीचे खंडोबाच दिसता!

**हेमंतः**—पदराचा पिसारा पसरून मोरासारखा नाच काय करतेस? आज काल महाराष्ट्रांत पहावं तो मुलींना हाच एक चाळा.

**चित्रांगीः**—पण पदरानं पवित्र होत असतां हें विसरता. पदरांनीं झाकून घेतलेल्या तान्हुल्यावर मातेच्या हृदयांतील पवित्र गुणाची पदराच्या रूपानं पाखर पडत असते.

**हेमंतः**—मग हे पवित्र गूण पदराच्या रूपानं असे वारेमाप का सोडीत असता ?

**चित्रांगीः**—तुमच्यासारख्या शब्दकसरती वैय्याकरण्याला भिऊन सारे अपशब्द माझ्या तोंडांत येऊन बसतात. तुमच्याशीं घडलेल्या थोड्या संभाषणानंतर माझी अशी खात्री झाली आहे कीं, पुरुषांशीं परिचय घडण्यापूर्वी साऱ्या स्त्रिया सच्छील असतात.

**हेमंतः**—तद्वतच स्त्रीचा परिचय झाल्यावर सारे पुरुष पापी बनतात.

**चित्रांगीः**—माझ्यासारख्या सच्छील कुमारिकेसमोर असे दुःशील उद्गार कां काढता ?

**हेमंतः**—सच्छील आणि दुःशील यांच्यामध्यें थोडाच फरक असतो. सच्छीलवंतांचा भूतकाळ काळा कुट्ट असतो आणि बदशीलवंताचा भविष्यकाळ काळाकुट्ट होणारा असतो.

**चित्रांगीः**—असलं वीष ओकायला कदर नाहीं वाटत ?

**हेमंतः**—आयुष्य हेंच स्वतः अपवित्र विषाचं ताट आहे.

**चित्रांगीः**—हें असलं विषमय अनुभवामृत माझ्यावर जुलमानं लादू नका.

**हेमंतः**—काय जुलम ? या जगांत जुलूमशाहीचा एकच प्रकार आहे. आणि तो म्हणजे तुझ्यासारख्या अबला म्हणविणाऱ्यांनीं लचक मानेनं, व गळेपडू करणीनं केलेला पुरुषजातीवरचा जुलम ! स्त्रीचा इतिहास म्हणजे या अद्वितीय जुलुमाचा इतिहास आहे. तुला संताप येईल, पण सांगतोच. तुझ्यासारख्या—

**चित्रांगीः**—तुझ्या तुझ्या काय म्हणतां? तुम्हांला म्हणालांत तर काय होईल.

**हेमंतः**—तुम्हाला कां म्हणत नाहीं तेंच सांगतों ऐक. तूं जरा फटकळ दिसतेस म्हणून विचारतों कीं आपण स्त्री आहोंत ही जाणीव दर पळागणीक

करून देण्यांत तुह्मी पुरुषवर्गाची अस्सल कर्तबगारी मातीमोल करीत असता याचा कधीं विचार केला आहे का ? ओठावर बोलणं काय, खोटांवर चालणं काय, हावभावाशिवाय एक पाउल घ्याल तर शपथ. अशा स्थितींत लग्नानंतर गृहप्रवेश होऊन मातृपदावर स्थीर होईपर्यंत तुह्माला मान कां द्यायचा ?

**चित्रांगी**:—मी फार मानी स्त्री आहे. माझा स्वाभिमान जखमीं करूं नका.

**हेमंत**:—हा स्वाभिमान नव्हे हा दुर्भिमान ( vanity ) आहे. मनोवृत्तीला जखम झाली तरच हृदयें कायम रहातात. नाहीं तर त्यांचा मागमूसहि रहात नाहीं.

**चित्रांगी**:—मला तुमचं पृथक्करण नको आहे ! तुह्मी तरुण आहांना ? आयुष्याच्या प्रेमग्रंथीचं पहिलं पान उघडतांच स्त्रीविषयीं नास्तिक बनलेले दिसतां हें पाहून तुमची कींव येते ! हूं ! प्रेमाचे आडवे उभे तडाखे बसण्याचा हा परिणाम असेल !

**हेमंत**:—प्रेम ! हुं ! आतां प्रेम प्रेम काय करूं लागलीस ? माणूस प्रेम करूं लागला ह्मणजे स्वतःला फसविण्याची सुरुवात करूं लागतो. आजपर्यंत प्रेमाशीं प्रसंग न आल्यामुळं स्त्री नास्तिक बनून ध्येयाचा रस्ता बिनचूक मला गाठता आला. आतां मात्र यापुढं प्रेमाचा तडाखा कसा काय बसतो तो पाहूं या ! कायग तुझी मैत्रिण तुझ्यासारखीच आहे का ?

**चित्रांगी**:—अगदीं बरोबर. माझ्यासारखी. मीच समजा ना. माझ्यावर प्रेम करावसं तुह्माला वाटतं कीं नाहीं ? अगदीं खरं खरं सांगा हं.

**हेमंत**:—( स्व. ) ही मुलगी खरोखरच का बेशरम आहे ? का अल्लड आहे ? कशीहि असो.

**चित्रांगी**:—द्याना माझ्या प्रश्नाचें उत्तर ?

**हेमंत**:—मी लग्नाकरितां आलों आहे. माझं लग्नही ठरलं आहे.

**चित्रांगी**:—मग माझंही लग्न ठरलं आहे. त्यांत कांय मोठं. पण माझ्यावर प्रेम करावंसं वाटतं कीं नाहीं ? वाटतं कीं नाहीं ?

**हेमंत**:—( स्व. ) हिनं तर अतिप्रसंग आणला. हिचीच मैत्रिण ती आमची वाग्दत्त वधू. आजकाल समाज पुढं चालला आहे कीं मी समाजाच्या पुढं चाललों आहे ?

**चित्रांगीः**—प्रेम आहे हें सांगायला विचार करण्याची बिलकूल गरज लागत नसते, हें तुह्मी नाटक कादंबऱ्यांतून नाहीं वाचलंत? मग इतका वेळ कां?

**हेमंतः**—पण मुली—

**चित्रांगीः**—पण, पण नको. प्रेम आहे असं ह्मणा पाहूं. तुमच्या या दोनच शब्दांची किंमत मला माझ्या पुढच्या सर्व आयुष्याइतकी मोलाची वाटते.

**हेमंतः**—( स्व. ) इच्या केसांत काळेपणा दिसतो पण हृदयांत दिसत नाहीं, शब्दांत फटकळपणा दिसतो पण भावनांत मार्दव दिसून येतं. विचार बेशरमपणाचे वाटतात, पण आचार अगदीं साळसूद असावेत. सारंच विचित्र.

**चित्रांगीः**—विचार सुरू झाले कीं अंतःकरणात चलबिचल झालीच ह्मणून समजावं. हं बोला मला आपली म्हणाना?

**हेमंत**—( रागानें ) असं ह्मणतांक्षणींच माझ्या हातून जर प्रेममंत्राला रतितंत्राची जोड मिळाली तर तुझं अखिल चारित्र्य कवडीमोल नाहींका होणार?

**चित्रांगीः**—कुणाकडून?

**हेमंतः**—माझ्याकडून.

**चित्रांगीः**—तुह्मीं कोण.

**हेमंतः**—मी—स्वतःच्या दोन दिवसावर येऊन ठेपलेल्या लग्नातला नवरदेव.

**चित्रांगीः**—मग मीहि लग्न ठरलेली नवरदेवता आहें.

**हेमंतः**—मग मी काय परक्या नवरदेवतेवर प्रेम करूं?

**चित्रांगीः**—या क्षणावेरीं मी परकी असेन. पण प्रेमानं परकेपणा पार लयास नेला आहे.

**हेमंतः**—ह्मणजे माझ्या वधूचा अपमान करतेस?

**चित्रांगीः**—कुणाचा?

**हेमंतः**—चित्रांगीचा. श्रीरंगाच्या मुलीचा.

**चित्रांगीः**—श्रीरंगांची मुलगी ती मीच. माझंच नांव चित्रांगी. हा माझा समान हक्क आहे. या प्रसंगाचं नांव वरपरीक्षा ( पळून जाते. )

**हेमंतः**—काय विचित्र आहे ही. ( चित्रांगी कल्याणीला घेऊन येते )

**चित्रांगी**:—अहो ही माझी मावशी बरं का! ( दोघीहि जातात. )

**हेमंत**:—ही काय वरपरीक्षा कीं फसवणूक? धडधडीत खोटं बोलून माझा फायदा घेतला! दुसऱ्यांचा फायदा घेण्याकरितां काय चवचाल तऱ्हा प्रसवतील हें या बायकांचं बायकांनाच ठाऊक. पण हे कोण ( शिशीर येतो. )

**शिशीर**:—( स्व. ) हे गृहस्थ कल्याणीची आराधना करायला आले आहेत कीं चित्रांगीची. चित्रांगीच्या मार्फत कल्याणीकडे संधान बांधायचा तर यांचा बेत नसेल ना? यामुळंच कल्याणी मला झिडकारते. का खरंच तिला अविवाहित रहायचं आहे. ( उघड ) काय हो, त्या दोघींपैकीं कुणावर तुमचं प्रेम बसलं आहे?

**हेमंत**:—( स्व. )मराठी भाषेंत प्रेमाशिवाय दुसरा शब्दच शिल्लक राहिला नाहीं कीं काय कोण जाणे? प्रत्येक तरुण माणसाच्या तोंडांत सारखा प्रेमाचा जप. ( उघड ) दोघीवरहि माझं प्रेम आहे. तुमचं काय म्हणणं आहे? प्रेम प्रेम म्हणजे तुम्हाला काय पायाखालची माती वाटली होय?

**शिशीर**:—कल्याणीनं तुमच्या प्रेमाला आपला होय दिला ना? हूंः! मग माझी जन्माची कायमची निराशा झाली ( जाऊं लागतो )

**हेमंत**:—अहो, तुम्हाला कांहीं अक्कल, तारतम्य, वस्तुस्थितीचं ज्ञान आहे की नाहीं? वाटेल त्या गृहस्थाला वाटेल तो प्रश्न विचारतां याचा अर्थ काय?

**शिशीर**:—म्हणजे आपलं नांव काय?

**हेमंत**:—हा प्रश्न आधीं विचारायचा का साऱ्या मूर्खपणाचं प्रदर्शन झाल्या-नंतर? शुद्ध शिपाई आहांत.

**शिशीर**:—चुकलं खरं हां. आपण थोर गृहस्थ दिसता. आपलं—

**हेमंत**:—मीच श्रीरंगांचा भावी जामात.

**शिशीर**:—आपण हेमंतराव तर. ( स्व. ) कल्याणीच्या बाबतींतील धास्ती गेली. ( उ. ) So glad to meet you. मी श्रीरंगाचा धाकटा भाऊ आपलाच लग्नमंडप साजरा करायला आलों आहे. जमल्यास स्वतःचंही लग्न उरकणार आहे पण—

**हेमंत**:—तें सर्व आतां समजलं. मग जा तर आपलं प्रेम वाट पहात असेल.

**शिशीर**:—हो खरंच ( जातो. )

**हेमंतः**—इथं आल्यापासून महाराष्ट्रांतील बरेच रुढाचार निदर्शनास आले. या चेष्टाचारानुरूप आपणहि तात्पुरती उलट खाल्ली पाहिजे, तरच निभाव लागेल ! पहिल्याच सलामीला चित्रांगीनं तर खूप बहार केली. तारुण्याच्या तोडी रागाचे सूर किती विचित्र असतात. जितके कोमल तितकेच हृदयाला कटु अनुभव आणून देणारे. या कटु अनुभवामुळें कित्येक जीवितांचा बदरंग होत असेल. स्त्रीपुरुष यांमधील भेदावर स्थायीभूत झालेली चीज प्रेम. या प्रेमाला प्रत्येक मनुष्य आपल्या आयुष्याचा मध्यभाग बळी देत असतो. प्रेम ही चीज या जगांत आहे कीं नाहीं? प्रत्येक जातीच्या सौंदर्याबद्दलची आवड, याचं नांव जर प्रेम असेल तर ते स्त्रीपुरुषामधील विधीभेदावर उत्कटतेनंच अवलंबून का असावं ? छेः प्रेम आणि परमेश्वर, हे दोन शब्द सर्वांत जास्त वेळां प्रत्येकाच्या हृदयावर आदळतात. पण सर्वांत जास्त असं गहन कोडं त्यांच्या अर्थाबद्दलच नेहमीं पडत असतं. सर्वांत कमी विचार जर कोणत्या शब्दावर होत असेल तर हेच ते दोन शब्द. शब्दाबद्दलहि अनाचार व अर्थाबद्दलहि शून्याकार ! छेः आपली भावना तर अगदी बेजार झाली.

**अंक पहिला समाप्त.**



# अंक दुसरा.



## प्रवेश पहिला.

[ स्थळ–दिवाणखाना. पात्रें:–कल्याणी, चित्रांगी, शिशीर. ]

**कल्याणीः**—होणार आतां यांच्या प्रेममहिम्न स्तोत्राला सुरुवात! प्रेमी जन आणि रांगतीं धांवतीं पोरं यांच्यांत बिलकूल फरक नसतो. खेळायची आठवण झाली कीं खेळायला सुरुवात, खेळणं दिसलं कीं झाली सुरू धडपड–बरं मनाविरुद्ध घडून आलं कीं झालाच रडायला प्रारंभ—

**चित्रांगीः**—फरक इतकाच कीं, मुलाची समजूत लाकडामातीच्या खेळण्यावर होते आणि यांनां—

**कल्याणीः**—हाडामासांचे लाल ओठ, टवटवीत गाल अगर पाणीदार डोळे यांचे काल्पनिक चित्र खेळायला द्यावं लागतं! या गोष्टीचा विचार करावा तो तो अगदीं किळस उत्पन्न होतो ( नंदिनी हातांत निखारे घातलेली पळी व मीठ मोहऱ्या घेऊन येते. )

**नंदिनीः**—चित्रे, बाई माझं ऐकशील का जरा?

**चित्रांगीः**—तुझी माझ्याजवळ कायमची खूण रहावी म्हणून हातावर डागबीग देणार आहेस कीं काय? हे निखारे कशाला आणलेस?

**नंदिनीः**—उद्यां तूं बोहल्यावर चढणार. आजच्या दिवसांत अवघी तुझी दोनदांच दृष्ट काढली. वेळीं अवेळीं वाटेल तिथं उभी असतेस. वाटेल त्याच्या जवळ बोलत बसतेस. सर्वांची दृष्ट कांहीं सारखी नसते. माझी बाळ ती. कर पाहूं माझ्याकडे मान!

**चित्रांगीः**—मला, दुर्गा, अंबा, कीं जगदंबा समजतेस? निखाऱ्यांची धुरी देऊन माझी पोळजत्रा करणार कीं काय?

**नंदिनीः**—हूं असं तोंडाला येईल तें बोलूं नये. कर माझ्याकडे तोंड.

**शिशीर**—वहिनी तिची कसली दृष्ट काढता. साऱ्या जगावर हिचीच दृष्ट पडायची. माझीच दृष्ट काढा.

**कल्याणीः**—अवश्य काढली पाहिजे. म्हणजे माझे हाल तरी वांचतील चित्राबाई, एका डोळ्याच्या डॉक्टरकडे जा यांना घेऊन.

**नंदिनीः**—कितीग वचावचा बोलतेस ? चित्रे माझं नाहींना ऐकत ? तुझ्या वेड्या भावड्या आईचं कशाला ऐकशील.

**चित्रांगीः**—घे बाई एकदांची काढून ! ही पहा वर मान करून बसते.

**नंदिनीः**—"दृष्ट मिष्ट कोण्या पापी चांडाळाची, आल्यागेल्याची, घरांतल्या बाहेरल्याची, भुताखेताची, तुझी माझी, पार जळून जावो." ( निखाऱ्यावर मोहऱ्या टाकते. )

**कल्याणीः**—झाली ? या मंत्रांत कीं नाहीं " रोगराईची, मोटार आगगाडीची, गिरणी कारखान्यांची " वगैरे कितीतरी सूत्रं गोवण्यासारखीं आहेत.

**नंदिनीः**— मला नाहीं तुझ्यासारखा पाचकळपणा करायला येत ! आईची चेष्टा करावीशी वाटते पण आईचं वात्सल्य नाहीं समजत ! तूं आई झाल्यावर असंच करशील बरं. कल्याणी, हेमंतराव मोठे सुस्वरूप व भव्य पुरुष आहेत हो. माझ्या कसे अगदीं मनासारखे जांवई मिळाले. माझ्या चित्रेचं किती थोर भाग्य.

**कल्याणीः**—खरंच ताई, पण तुला माहीत आहे का ? म्हणे हेमंतरावांना बायकांनीं दागिने घातलेले आवडत नाहींत.

**नंदिनीः**—इश्श, मग चित्रांगी सुरेख कशी दिसणार ?

**शिशीरः**—वयनी त्यांत काय झालं ! नवरानवरीचीं मन जमून एकतानता झाली म्हणजे झालं. जिथं प्रेम तिथं लग्न. नाहींतर हे सारे चेष्टाचार असूनही जर उभयतांमध्यें प्रेम नसेल तर ते कसलं लग्न ? निव्वळ लग्नाचं नाटक. ( श्रीरंग येतात. )

**श्रीरंगः**—ऐकलं काग ? तुझं नांव घेऊनच विचारणार होतों; पण तुला राग येतो म्हणून. एका बाबतींत तुझा सल्ला विचारायचा आहे. बिहारी लग्नाला म्हणून आला आहे. फराळ करीत बसला आहे घरांत. त्याला राहून ध्यायचा कीं कसं ?

**शिशीरः**—असला काळतोंड्या माणूस आमच्या घरांत लग्नासारख्या पवित्र प्रसंगीं तरी बिलकूल नको. सख्खा भाऊ झाला म्हणून काय झालं ? वेश्यागमनासारख्या हीन व्यसनांत उभ्या जन्माचं मातेरं करणारा बिहारी या

पवित्र कुमारिकांसमोर कसा काय येतो तें पहातों. माझ्या कोटाचीं कुणी बटणं तरी काढारे!

**चित्रांगी**—म्हणजे त्यांच्याशीं कुस्ती मारणार कीं काय?

**कल्याणीः**—हा लढाऊ मर्दांचा आव आहे.

**श्रीरंगः**—बरं हें एक मत झालं. तुमचं काय मत?

**नंदिनीः**—छेः बाई माझ्या मुलीच्या लग्नांत अपवित्र असं मी कांहीं करूं देणार नाहीं. बिहारी भावजी आले तर त्यानीं आपलं माडीवर बसावं!

**श्रीरंगः**—हीं दोन्हीं झालीं जहाल मतं. चित्रे, कल्याणी तुम्हाला कसं वाटतं?

**चित्रांगीः**—आमच्या घरांत त्यांनीं यावयाचं नाहीं इतकंच नव्हे तर त्यांचं कुणी सुतकहि धरतां कामा नये.

**कल्याणीः**—पापाचरणांत रत झालेलीं माणसं समाजाला मेलीं असं समजावं. Census मध्येंहि त्यांची शिरगणती करूं नये.

**श्रीरंगः**—हीं झाली ज्वलत् जहाल मतं. बिहारीची धडगत दिसत नाहीं. माझं स्वतःच मत म्हणाल तर, बिहारीनं यावं, पण त्याचा अपमान झाल्यास आम्हीं जबाबदार नाहीं असं आहे. तुम्हाला वाटेल तो निर्णय द्या. नाहीं तर 'इंद्राय तक्षकाय स्वाहा' म्हणून आमची वाट लागायची.

**शिशीरः**—हें पहा बाबासाहेब, तुमचें मी बिलकूल ऐकणार नाहीं. धक्का देऊन घालवून देईन. माझ्या ताकदीचा उपयोग होणार तर!

**श्रीरंगः**—( स्व. ) काय लोकांची गम्मत असते पहा, एखादे वेळीं त्यांच्या नीतिमत्तेला केवढा ऊत येतो. बिहारीच्या येण्यानं आम्हां सुनीत लोकांची नीतिमत्ता बिघडेल असं थोडंच आहें! रूढाचारांची गंमत वाटते ती हीच! ( बिहारी येतो. )

**बिहारीः**—नमस्कार. कॅप्टनसाहेब ( सर्व त्याच्याकडे पहातात )

**शिशीरः**—आलेत तसे बाहेर चला. का घालवून देऊं.

**बिहारीः**—म्हणजे काय? माझा येण्याचा हक्क आहे. बाबासाहेब, तुमच्या दारावरचं हें कुत्रं जरा आवरतं घ्या पाहूं.

**शिशीरः**—चूप. कुत्र्यासारखं भुंकू नकोस. हें काय वेश्यांचं घर आहे वाटतं? इथं एक क्षणभरहि उभं रहाता कामा नये.

**बिहारीः**—मग बसतो तर ( बसूं लागतो तोंच शिशीर त्याचे हात पकडतो. श्रीरंग मध्यें येतात. शिशीर बाजूला होतो. बिहारी बसतो. )

**श्रीरंगः**—बिहारी, आपण लग्नाला येऊं नये. हेंच बरं. तुमचं चारित्र्य ठीक आहे. पण आम्हाला जरा वाईट वाटतं इतकंच.

**नंदिनीः**—भावजी, आपण जाल तर बरं होईल.

**चित्रांगीः**—काकासाहेब, लग्नांत वेश्या, नायकिणीचं गाणं बजावणं कांहीं एक नाहीं आपला वेळ कसा जाईल ? इथं येण्याऐवजीं–एखाद्या–जाऊ द्या. न बोललेलंच बरं. जातां कीं नाहीं ?

**कल्याणीः**—अतिप्रसंग करून घेण्यांत काय अर्थ आहे. मानानं येऊन मानानं परत जावं हेंच जास्त श्रेयस्कर.

**बिहारीः**—मला एक घालवून द्याल. पण नवरामुलगा बदचालीचा आहे असं समजल्यावर त्यालाहि तुमचा समाज घालवून देतो काय ? चार चौघांचं एक मत पडलं म्हणजे वाटेल त्या माणसावर असा जुलूम चालवायचा होय ?

**शिशीरः**—हेमंतराव तुझ्यासारखेच पागल आहेत कीं काय ?

**बिहारीः**—असं मुळींच नाहीं मी फक्त समाजाच्या नीतीच्या लहरीबद्दल बोललों. एखादे वेळीं समाजाला नीतीची एवढी उकळी फुटते ? तुमच्या नीतीच्या कल्पना सुसंगत आहेत कीं नाहींत याची लवकरच कसोटी लागणार आहे. माझी वृंदा इतक्यातच इथं येणार आहे.

**चित्रांगीः**—( कल्याणीस ) रंगेलरावाबरोबर येणार असेल माझ्या पत्राप्रमाणें.

**श्रीरंगः**—मग वृंदेलाहि लग्नाला येऊं द्यायची कीं नाहीं हा एक नवीनच प्रश्न उपस्थित झाला.

**शिशीरः**—वृंदा येत आहे म्हणजे ? तुमच्याबरोबर नाहीं का आली ?

**बिहारीः**—कसली नादान बायको ! नायकिणीचीच पोर. पश्चात्ताप होतो.

**नंदिनीः**—माझ्यानं हें ऐकवतसुद्धां नाहीं ! ऐकलं का ? जाऊबाईंनां घरांत मुळींच येऊं देऊं नये.

**बिहारीः**—तेंच आतां मी पहातों. ती त्या लाळतोंड्या रंगेलला घेऊन आलीरे आली कीं मी बाहेर पडलोंच म्हणून समजा. पहातोच ना आतां. ज्या

अर्थी नीतीच्या सबबीवर मला येण्याची बंदी केलीत त्याअर्थी तिलाही अर्धचंद्र मिळालाच पाहिजे.

**चित्रांगी**:—तिचं आह्मीं मोठ्या थाटानं आगतस्वागत करूं व चार दिवस राहून घेऊं. काय समजलं बिहारीकाका ?

**नंदिनी**:—मग मीच घर सोडून जात्यें.

**श्रीरंग**:—अग थांब ग, काय काय गमती होत आहेत तें पाहूं आणि एकदमच जाऊं.

**चित्रांगी**:—काका, वृंदा रंगेलसंबंधीं जर वाईट उद्गार काढला तर तुह्मालाही घर सोडून जावं लागेल. ती पहा आली ( वृंदा रंगेल येतात. )

**वृंदा**:—भावजी नमस्कार करते बरं ( श्रीरंग व शिशीर यांना नमस्कार करते ) बाई, तुह्मीं ही इथंच का ? ( नंदिनीला नमस्कार करावयास जाते. ती तोंड फिरविते ) ( बिहारीस ) स्वारी इकडे आली वाटतें ? ( चित्रांगीस ) चित्रे लगीनकळा कितीग तुला शोभून दिसते ( कल्याणीस ) तुमचं कुठपर्यंत आलं ? दुसरं जोडपं अक्षता टाकायला लवकरच लाभणार कीं नाहीं. ( रंगेल-रावास ) रंगेलराव, आपण असे दूर दूर कां ? ( सर्वांस ) मला समाजानं दिलेली ही देणगी आहे ( बसते )

**बिहारी**:—( स्व. ) काय बेशरम आहे पहा ? नको हें पहाणं ( उघड ) नमस्कार. येतों मी. हे थिल्लर चाळे मोठ्या नीतीमान मनानं पहात बसा. ( जाऊं लागतो. )

**शिशीर**:—खबरदार बिहारी, जाऊं नकोस .बैस इथं.

**चित्रांगी**:—तुह्मी पण रहाचना काका.

**कल्याणी**:—एवींतेवीं आलांत खरे. आतां जाण्यांत काय अर्थ राहिला.

**बिहारी**:—काय आश्चर्य आहे ! माझ्या मनांतून जेव्हां रहावयाचं होतं, तेव्हां एकदम गिल्ला करून घालविण्याची खटपट चालविली. आतां माझ्या मनांतून जायचं आहे तों राहविण्याची लगट चालली आहे ! हा काय समाज की सैतान ! हा काय शिष्टाचार ? बाबासाहेब या रंगेलरावाला येथून काढून लावा ! त्या लालतोंड्याकडे माझ्यानं पहावत सुद्धां नाहीं.

**नंदिनी**:—( स्वगत ) या बिघडलेल्या घरांत माझ्यानं बसवतसुद्धां नाहीं. आपलं देवघरांत दार बंद करून बसावं हें बरं. ( जातो. )

**रंगेल:**—( स्वगत ) आज माझ्या प्रेमाचा हा केवढा जयजयकार चालला आहे.

**बिहारी:**—वृंदे, कालिमा लागत आहे याची शरम नाहीं वाटत ?

**वृंदा:**—शरम कां वाटावी ? तुमची पापं आम्हां बायकांना भोंवतात तीं हीं अशीं. आपली अर्धांगीना मी ? आपले अर्धे पापाचार माझ्यांत उतरल्यासारखे दिसल्यास आश्चर्य तें कसलं ?

**बिहारी:**—आम्ही पुरुष आहों व तुम्ही स्त्रिया आहां. धर्मानं आम्हाला वाटेल तितक्या स्त्रियांची मोकळीक ठेविली आहे.

**वृंदा:**—समान हक्कानं आम्हीं ती मोकळीक कां घेऊं नये ?

**बिहारी:**—समान हक्क ! समान हक्काच्या नांवाखालीं नवऱ्याच्या तोंडाला वाटेल तशी काळोखी फासावी ! या लालतोंड्याला जा म्हणून सांगतेस कीं नाहीं ?

**चित्रांगी:**—अहो तिच्यावर असली सत्ता गाजवायची होती तर तिला दत्तक घ्यायची होती, लग्न लावायचं नव्हतं !

**कल्याणी:**—एकपत्निव्रताच्या मदतीला जोपर्यंत कायदा व धर्म येऊं शकत नाहींत तोंपर्यंत बायकावर अद्वितीय हक्क मिळवून देणारी लग्नसंस्थाच रद्द केली पाहिजे.

**शिशीर:**—कल्याणी, काय बोलतेस तूं हें ?

**चित्रांगी:**—समाजाच्या अंगाला रुतलेला कांटा कांट्यानेंच निघावा असं मला वाटतं.

**शिशीर:**—पण त्यामुळं या दोन्हीं कांट्यांनीं समाजाचं अंग रक्तबंबाळ होऊन निघेल, याचा कांहीं विचार ? आज फक्त पुरुष बिघडलेले आहेत. या मार्गानं बायकाहि बिघडतील.

**कल्याणी:**—मग त्यापेक्षां पुरुषांनींच स्वतःला कां सुधारूं नये. कांहीं बुद्धिवाद म्हणून आहे कीं नाहीं ? आपण बेशरमपणानं वेश्या नाचवायच्या आणि घरांतल्या बायकोला तूं असं करूं नको आणि तसं करूं नको म्हणून सांगायचं.

**बिहारी:**—हें सगळं जरी खरं असलं तरी माझ्या स्त्रीनं अमूक माझा प्रियकर म्हणून नवऱ्यासमोर सांगणं याचा अर्थ काय ?

**श्रीरंगः**—वेश्यागमनाच्या पातकांत आकंठ बुडालेल्या नवऱ्याला चतुर स्त्रियेनं दुसरं काय सांगायचं ? चतुर, कल्पक व निर्दोष स्त्रियांना वेश्यागमनी नवऱ्याबरोबरच आपल्यालाहि एक प्रियकर असावा असं कारणपरत्वें वाटणं अगदीं साहजिक आहे.

**शिशीरः**—याचा अर्थ इकडील स्त्रियांनीं—

**श्रीरंगः**—सबूर ! तूं शास्त्री कीं मी शास्त्री रे ?

**शिशीरः**—तुम्ही. मी एक शिपाई आहें. माझा खास धर्म म्हणजे पवित्र प्रेम.

**श्रीरंगः**—मग धर्म सांगण्याचा आव आणू नकोस. विवेक हा आमच्या-सारख्याकरितां आहे. फक्त मरण हें तुमच्यासारख्या लढत्या शिपायाकरितां !

**शिशीरः**—ठीक आहे. चालूं द्या. तुमच्या दृष्टीला मी एक वेडगळ प्रेमी आहे असं वाटतं.

**रंगेलः**—( स्व. ) हा एक तेवढा माझ्यासारखाच प्रेमी माणूस दिसतो. बाकीच्यांच्या भाषणांत प्रेमच नाहीं.

**श्रीरंगः**—नीतीच्या प्रश्नाचा खल करायचा असेल तर बद नीतीची कैफियत प्रथम ऐकली पाहिजे. हिंदुधर्म तसं करीत नाहीं. समाज तसं करीत नाहीं. स्त्री ही पापी आहे असं गृहित धरून चालतो व तिच्याबद्दल उठणाऱ्या वाटेल त्या वारापिऊ गप्पांवर "चक्षुर्वै सत्यम् " इतका विश्वास ठेवतो. याचा उलट परिणाम असा होतो कीं पुरुष मात्र शक्य तितके दुर्नित बनत जातात व त्यामुळं बद्-नीतीचा मात्र उदो उदो होतो.

**बिहारीः**—माझी समजुत अशी होती कीं, वृंदेला कांहींतरी सदुपदेश करून ताळ्यावर आणाल.

**चित्रांगीः**—स्त्रियांच्या मधूर पण मर्मभेदी, कोमल पण द्विधारी सुरेल पण किन्हरी आर्जवांनी जर पुरुष सुधारले नाहींत, तर पुरुषांच्या आपमतलबी ढोलऱ्यानीं स्त्रिया ताळ्यावर येणार होय ?

**शिशीरः**—बाबासाहेब, माझा आपला गाढवी प्रश्न सरळ विचारतों, बायकांनीं नवऱ्याविरहित प्रेम करावं होय ?

**श्रीरंगः**—तूं महाराष्ट्राचा रहिवाशी आहेस. महाराष्ट्रांतील बरेच पुरुष आपण वेळ आल्यास वाटेल तितकी लग्नं करावीं अशा पथळ मतांचे व

आचारांचे आहेत. इतकंच काय तर कुठ कुठ प्रेमपात्रं बाळगणं हें एक भूषणच म्हणून समजलं जातं. अशा स्थितींत या प्रेमसंकेताविरुद्ध बोलून मी त्यांचा अपमान करूं इच्छित नाहीं! त्यांच्या या प्रेमाचे रूढ संकेत बहुत वर्षांनंतर स्त्रियांनीं उचलले तर त्यांचा काय दोष! पुरुष आचरतात तसं बायका करतात. अनुकरण हा मनुष्याचा जन्मस्वभाव आहे.

**बिहारी:**—उत्तम आहे तुमचं धर्मशास्त्र.

**शिशीर:**—भले बहाद्दर! तुमच्या या धर्मशास्त्रानं महाराष्ट्र म्हणजे वेश्या-वृत्तीचा बाजार, लवकरच बनणार.

**श्रीरंग:**—एरव्हीं बिहारीसारख्याची चंगळ कशी उडावी?

**वृंदा:**—तुम्हीं तिघे भाऊ जमल्यावर भांडणाशिवाय मुळीं बोलतच नाहींं.

**श्रीरंग:**—वयनी हें भांडण नव्हे हें समाजचित्र आहे.

**बिहारी:**—आणि वृंदा रंगेल हेंहि एक समाजचित्रच असेल.

**चित्रांगी:**—छेः छेः आपण मात्र एक समाजाचं ठळक चित्र आहां हें खरं. आपल्या चित्रामुळं या चित्राचा जन्म झाला. इतकंच नव्हे, तर आपल्या-सारख्या विचित्रामुळं असली अनेक चित्रं समाजांत खुशाल वावरायला लागतील हें भविष्य आपणाला ही चित्रा सांगत आहे, याची पुरुष जातीनं नोंद करून ठेवावी.

**बिहारी:**—तुम्ही वाटेल तसा पाणउतारा करावा आणि मी ऐकत बसावं यात अर्थ काय? वृंदे तुला इथं एक क्षणभरहि रहातां येणार नाहीं. चल माझ्या-बरोबर घरीं.

**कल्याणी:**—काकू बिलकूल येणार नाहीं.

**बिहारी:**—तू कोण अडथळा करणार?

**चित्रांगी:**—तें मागाहून पाहूं. पण काय हो काका तिनं का यायचं तुमच्या घरीं! तुम्हीं काय करावयाचं ठेवलं आहे? (हंसून) नाहीं म्हणायला तिला अनाथाश्रमांत पाठवायचं बाकी ठेवलं आहे?

**बिहारी:**—बेशरम! वाटेल तें चघळायला जशी काय पोळ सुटली आहे.

**कल्याणी:**—शिव्या देणं हा मोठेपणाचा शिष्टाचार आहे. चालू द्या.

**बिहारी:**—(स्व.) या घरांत वादविवाद करण्यांत अर्थ नाहीं. मूग गिळून बसलं पाहिजे. साऱ्या घराची घाण करायला कारण बाबासाहेब.



**श्रीरंगः**—दोन सख्या बहिणी दोन जावा होऊं शकत नाहींत ! पृ. ५१

**चित्रांगी**:—कां रंगेलराव, तुह्मी अगदीं गप्पसे ? तुमच्या रंगेल वृत्तीचा लय झाला वाटतं.

**रंगेल**:—नाहीं ! हा नेकटॉय फार घट्ट बसल्यामुळें तोंडांत जीभ जशी हलावी तशी हलत नाहीं.

**चित्रांगी**:—नेकटाय बांधायला शिकणं ह्मणजे तरी आयुष्याचा बराच मोठा भाग हस्तगत करण्यासारखं आहे. बाकी तुमच्यासारख्या प्रेमीजनांच्या गळ्याला बंद अवश्य पाहिजेत.

**कल्याणी**:—हो, नाहीं तर प्रेमोद्गारांचा आवेग मोकाट सुटल्यामुळं रस्त्यांत भेटणाऱ्या जख्खड म्हातारीजवळसुद्धा प्रेमयाचनेला सुरुवात करायचेत ! खरं कीं नाहीं, शिशीर ?

**शिशीर**:—तुला आमच्या प्रेमाची चेष्टा करायला काय ?

**चित्रांगी**:—मावशी, एकदा शेवटचं सांग हां, तू लग्नाला तयार होणार कीं नाहीं ?

**कल्याणी**:—अग, मी तयार आहेंच.

**शिशीर**:—कल्याणी ! Is that a Gospel truth ?

**श्रीरंग**:—अरे बाबांनो, पण हिंदु शास्त्राची परवानगी नाहीं. दोन सख्ख्या बहिणी, दोन सख्ख्या जावा होऊं शकत नाहींत.

**शिशीर**:—Lost ! My life is lost then ! या धर्माची आडकाठी मी मेल्याशिवाय कशी दूर होणार !

**चित्रांगी**:—आमच्या धर्माला जितक्या पळवाटा माहीत आहेत तितक्या या जगातील अस्सलांत अस्सल चोरालाहि ठाऊक असणं दुर्लभ ! काका, निराश होऊं नका ! लग्नापूर्वी मावशीच चेष्टेनंजा दत्तविधान उरकलं ह्मणजे झालं. कां आहे कीं नाहीं शास्त्रीबुवांची मुलगी ?

**कल्याणी**:—आहेस बरं, पण कल्याणी ही लग्न करणारी मुलगी नव्हे.

**चित्रांगी**:—नसली ह्मणून काय झालं ? दत्तविधानानं लग्न करणं अवश्य होऊन बसेल असं थोडच आहे ?

**कल्याणी**:—धर्मानं हा मेला दत्तविधानाचा चेष्टाचार कां माजवून ठेवावा कुणाला ठाऊक ? शरीरसंबंधाच्या आड येणारे दोष दत्तविधानानं थोडेच बरे होणार आहेत.

**श्रीरंगः**—कल्याणी, वृथा भावनेवर उभी असलेली आमच्या रूढीची इमारत बुद्धिवादाची पाचर लावून अशी उलथून पाहूं नकोस. दत्तविधान होऊन भटभिक्षुकांना यथेच्छ दक्षणा मिळाली म्हणजे जवळची नातेवाईक माणसं लग्नाच्या प्रथींत आपोआप येऊन पडत असतात.

**चित्रांगीः**—बाबा, खरंच मग मावशीचं दत्तविधान घ्याना उरकून.

**श्रीरंगः**—अग खुळे, पण तुझा आग्रह हा कां ?

**चित्रांगीः** उद्यांच उरकून घ्यायचं ठरवा म्हणजे होमहवनाच्या धुराला एक नवीन भागीदार मिळेल.

**श्रीरंगः**—अग पण कल्याणीच्या इच्छेविरुद्ध तुझा कां जुलूम ?

**शिशीरः**—बाबासाहेब, कराना पोरीचा हट्ट पुरा. माझ्या लग्नाच्या ग्रंथाची प्रस्तावना पुरी झाल्याचं मला सहज समाधान लाभणार आहे.

**श्रीरंगः**—कल्याणी आहे तुझी कबूली ?

**कल्याणीः**—चित्रेचा हट्टच असेल व शिशीरानां त्यांत वृथा समाधन होत असेल तर माझं काय जातं? एक का पन्नास दत्तविधानं करून घ्यायला मी तयार आहें.

**चित्रांगी**—( स्व. ) हिची कबूली मिळाली हें तर सर्वांत मोठें आश्चर्य ! हिच्या ह्या कबूलीवरून शिशीरकाकांची तपश्चर्या फळाला येणार अशी अटकळ केल्यास ती चुकीची ठरणार नाहीं.

**श्रीरंगः**—पण हिला दत्तक घेणारी एक मांडी तयार केली पाहिजे.

**चित्रांगीः**—आमचे रंगेलराव.

**रंगेलः**—हो. आमची तयारी आहे.

**श्रीरंगः**—परंतु दत्तविधानान तिला भाऊ जोडायचा नाहीं. बाप मिळवायचा आहे.

**रंगेलः**—मग आमचे कंगालराव, म्हणजे हेमतरावाचे चुलते आहेत. माझ्या दाट परिचयाचे आहेत.

**श्रीरंगः**—मग जमला सारा बेत. रंगेलजी, त्यांनां सांगा ही हकीगत व मिळवा त्यांचा रुकार. ( स्व. ) कदाचित चित्रेच्या मनांत शिशीर कल्याणीचा विवाह तर घडवून आणायचा नाहीं ? तसं असेल तर मी तरी कां हरकत

घ्यावी! परमेश्वरी संकेत, ज्याचा तो पार पाडीत असतो. ( उघड ) चित्रे, तुझ्या मनाप्रमाणं उद्दीक घ्यायचं उरकून दत्तविधान.

**रंगेलः**—ठीक आहे. हा मी त्यांच्याकडे जातो व रुकार मिळवितों.

[ पडदा पडतो. ]

---

## प्रवेश दुसरा.

( स्थळः—रस्ता जानिवशाच्या बंगल्यालगतचा. )

( पात्रंः—हेमंत. )

**हेमंतः**—( स्व. ) स्वतःच्या हृदयातून एखाद्या भारलेल्या गलबताप्रमाणं फिरतांना भावनांच्या भोवऱ्यांत मन सारखें हेलकावे खात आहे. परंतु ठाम निर्णयाची तड अशी लागत नाहीं. असला नाटकी घोटाळा उत्पन्न करण्याचा चित्रांगीचा हेतू तरी काय असावा? वरपरीक्षा हाच एक हेतू असावा का? तिच कुठं मन असावं कीं निव्वळ विनोद असावा? तरुणांचं भावी आयुष्य स्त्रीसहवासात रांधलं जात असतं. आयुष्याची जाणीव असणाऱ्या प्रत्येकाचं मन लग्नमंडपांत पाऊल ठेवतांना विचारांच्या वातचक्रानं माझ्याप्रमाणं संभ्रावत असेल का? स्त्रीविषयीची माझीं नास्तिक मतं चित्रांगीच्या साहचर्यांत जास्त भेसूर होत जातील कीं त्यांची तीव्रता कमी होईल? ज्या प्रेमानं जग पागल बनूं शकतं, त्या प्रेमाबद्दल मलाच कसा आदर वाटत नाहीं? प्रेमाचे शाहीर, स्त्रीसौंदर्याचे उथळ परीक्षक, रसिक रसवंत व महाराष्ट्रांतील अवघे प्रेमीजन मला निर्विकार, निर्गुण व निरस समजतील! पण मी असा निवळ विचार करीत काय बसलों? काव्याप्रमाणेच तत्त्वज्ञानानेहि कार्यनाश होतो. या बेशिस्तीच्या समाजांत येऊन पडल्यावर जशी वेळ येईल तशी उलट न खाल्ली तर मी महाराष्ट्रीय तो कसला? गनिमी काव्याशीं गनिमी काव्यानंच लढलं पाहिजे. ( पाहून ) बाबासाहेब इकडेच येताहेत! असल्या माणसाबद्दल मला मनापासून आदर वाटतो. या हृदयांत थिजलेलं काव्य, प्रेम व आदर यांना पाहिल्यावर एकदम हेलावूं लागतात.

**श्रीरंगः**—कोण हेमंतराव? बाळ कुणाची मार्गप्रतीक्षा चालली आहे?

**हेमंतः**—स्वतःच्या लग्नाची व मधून मधून भावी आयुष्याची.

**श्रीरंगः**—ही हॅम्लेटसारखी वागण्याची तऱ्हा फार वाईट. कार्याला एकदां हात घातला कीं विचार बिलकूल करतां उपयोगी नाहीं. विचार ही जशी एक शक्ति आहे तशी अविचार ही धारणात्मक शक्ति आहे.

**हेमंतः**—बहिरंगान विसंगत दिसणाऱ्या या विधानांत पूर्ण अर्थ आहे हें मला मान्य आहे. पण बाबासाहेब तुमचे हे Paradoxes समजायला फार कठीण जातात.

**श्रीरंगः**—हेमंत, हे विरोधी मेळ मनाला पटल्याशिवाय विसंगतीनं परिपूर्ण असा हा जगाचा ग्रंथ समजणार तरी कसा ? जग ह्मणजे परांकोटीला पोहोंचलेली करुणस्वरूपी कठोर विसंगति आहे.

**हेमंतः**—बाबासाहेब, तुमच्यासारख्या अद्वैताच्या पुरस्कर्त्यांनीं द्वैतावर विश्वास ठेवण्याइतकं विपरीत दुसरं कांहींच आढळणार नाहीं.

**श्रीरंगः**—दैवावर आपण विश्वास ठेवतोंच कीं नाहीं ?

**हेमंतः**—दैव ही विश्वास ठेवण्यासारखी संस्थाच नव्हे. दैव म्हणजे विपरीत विसंगति.

**श्रीरंगः**—तरी पण तिचा आपणाला विश्वास पटतो. उदईक तुमचें लग्न होणार. परंतु घटकाभर असं मानू कीं दैवामुळं राहिलं. असल्या अनुभवानंतर दैवावर विश्वास बसेल कीं नाहीं ? तें दैव आणि द्वैत या दोन्ही गोष्टी ह्मणजे अज्ञाताच्या इच्छा, दुसरं काय ? तुझ्याशीं बोलण्यांत मोठा रस उत्पन्न होतो, पण तुमच्याकरितांच–तुमच्याकरितां हा शब्द प्रयोग तुह्मीं आमचे जामात आहां या गोष्टीच्या स्मरणामुळंच झाला–मला गेलं पाहिजे. लग्न नीट झाम-झुमींत पार पडलं पाहिजे. नाहीं तर तुह्मीं लोक रुसायचे, फुगायचे अगदीं बायको टाकण्यापर्यंत पाळी आणायचे ! अहो, करायचं काय ? साऱ्या समारंभांतील चेष्टाचारामुळंच महाराष्ट्राला महाराष्ट्रपण आलं आहे.

**हेमंतः**—बाबासाहेब, एक गोष्ट विचारायची राहिली. तुह्मीं माझं लग्न ताशावाजंत्र्यांच्या घनघोर कडाक्यांत उरकणार कीं काय ? लग्न ह्मणजे पवित्र प्रसंग ! तो अत्यंत शांततेनं पार पडला पाहिजे. ताशेवाजंत्री यांची रण धुमाळी, विहिणींची कोल्हेकुई, आचारी पाणक्यांचा शंखनाद, भट भिक्षुकादि पंक्तीबहाद्दरांचा हरहरमहादेव यांच्या भेसूर मिश्रणांच, लग्नमंडप ह्मणजे पानिपत आहे अशी खात्री पटते. बाबासाहेब निव्वळ धार्मिक तेवढा विधी

माझ्या लग्नांत झाला पाहिजे नाहीं तर लग्नमंडपांतून पळणाऱ्या दुसऱ्या रामदासाचं नांव आपल्या कानांवर येईल.

**श्रीरंगः**—अहो रामदास, तुमचीं मतं मला पूर्ण माहीत आहेत. तुमचं लग्न ह्मणजे निव्वळ वैदिक पद्धतीनं उरकलं पाहिजे ही गोष्ट मला मान्य आहे. पण दहांच्याहि हौसेला मान दिला पाहिजे. पाहूं या कसं जमतं तें! बरं मी येतो तर. विशेष कसला विचार करायचा नाहीं हें धोरण मात्र सोडूं नका हो. (जातो.)

**हेमंतः**—किती प्रसन्न वृत्ति ही. अनुभवाच्या कडवटपणाने, जगाच्या रहाटीनं, अगर वयाच्या जुनावटीनं, उदासीन, बोथट, अगर बेमुर्वत बनण्या-ऐवजीं, यांची वृत्ति लहान मुलाप्रमाणं टवटवीत, विनोदपंडिताप्रमाणं आनंदी व आत्मज्ञान्याप्रमाणं अगाध अशी बनली आहे याचं नवल वाटतं. वागणुकींत सरळ बुद्धिवाद, वाणींत दुसऱ्याला चटक लावणारी विनोदी खोंच व विचारांत अनपेक्षित स्वातंत्र्य, असल्या गुणांनीं मंडित असलेले गृहस्थ मला तरी निदान हे प्रथमच आढळून आले! वृथा रूढाचारांनीं गजबजलेल्या जगतांत, प्रेमाचं भयंकर खूळ पिकवणाऱ्या मानवजातींत व क्षूद्र स्वार्थाला सवकलेल्या समाजांत असल्या व्यक्ती आढळणं म्हणजे कांहीं लहानसहान गोष्ट नव्हे. छिचोर, नेभळट अशा मूर्ख माणसांच्या सहवासांत हरहमेश–( रंगेल येतो व पाठीवर थाप मारतो. )

**रंगेलः**—Good-day ! How are you Mr....( हेमंत मागं सरकतो ) Sorry माफ करा. लांबून तुह्मीं माझ्या जिवलग दोस्तासारखे दिसलां ह्मणून जरा अतिप्रसंग झाला. अहो चालायचंच. समाजांत असं पुष्कळ वेळां घडून येतें.

**हेमंतः**—अहो पण कां घडून यावं ? इतका उतावीळपणा कां? तुह्मी काय पोर आहां, का एखादी स्त्री आहां, का गळयांत जिन्नस बांधणारे Hacker आहां ?

**रंगेलः**—माझ्या उतावीळपणाचं कारण तुह्माला माझ्या गाढ प्रेमांत आढळून येईल! प्रेमी जनाकरितां मी अगदीं हपापलेला असतों. माझें स्नेही हेंच माझं जीवन, प्रेमवाङ्मय हेंच माझं भोजन व प्रणयाचीं स्वप्नं हेंच माझं शयन.

**हेमंतः**—वः प्रेमाच्या जीवावर विश्वबंधुत्वापर्यंत जाऊन पोंचले असाल ?

**रंगेलः**—छे, छे, छे, छे, तुमचा दुराग्रह झालेला दिसतो. हे विश्वबंधू ह्मणविणारे जगांतील कित्येक लोक विश्वयोषितापर्यंतहि जावयाला मागं पुढं पहात नाहींत.

**हेमंतः**—मग तुमच्या मनांतून विश्वाची उभारणी प्रेमावर व्हावी तर ?

**रंगेलः**—अगदीं बरोबर बोललांत. द्या टाळी. विश्वांतील यच्चावत पदार्थांची रचना प्रेमावर झाली पाहिजे. भूगोलाची वस्ती ही त्या त्या प्रकृतीमात्राला आवडेल अशा थाटानं बनविली पाहिजे. सर्व तरुणांनीं कन्याकुमारीला जाऊन रहावं, पोपटांनीं पेरू देश काबीज करावा, रडक्या पोरांची वसाहत कुच-बिहारला, वांझ स्त्रियांची हकालपट्टी पोरबंदरला व साऱ्या भिकाऱ्यांची रवानगी सोनापुरांत करावी !

**हेमंतः**—प्रेमाच्या बाबतींत तुमची बुद्धिमत्ता विलक्षण तऱ्हेनं जागृत झाली आहे यांत बिलकूल शंका नाहीं. परंतु या गोष्टी माझ्याजवळ–एक नवख्या माणसाजवळ अचानक बोलतां याचा अर्थ काय ?

**रंगेलः**—तुमच्यासारख्या ऐन उमेदींतल्या माणसाजवळ प्रेमासंबंधीं वाटेल तेवढं बोलायला वेळ हा केव्हांच पुरायचा नाहीं, असा माझा अनुभव आहे बायकांच्या कुटाळक्यांना सुरुवात करा, प्रेमाच्या गोष्टी काढा, तरूण माणूस रमलाच म्हणून समजा. मग तिकडे त्याची आई मृत्युमुखीं पडलेली असो अगर बाप फांसावर चढला असो ! प्रेमासंबधीं बोलायला कुणीतरी मला अवश्य शोधून काढावा लागतो.

**हेमंतः**—( स्व. ) याच्या बोलण्याचा मनाला संताप करून घेण्यांत कांहीं अर्थ नाहीं. जो माणूस जसा भेटेल तसं आपणहि वागण्यास सुरुवात करावी. पाहूंया काय गम्मत होते ती ! ( उ. ) आतां तुम्हाला खरंच सांगतों, मीहि तुमच्याप्रमाणेंच प्रेमाला भुकेलेला माणूस आहे. स्त्रीच्या प्रेमानं हलकं झाल्याशिवाय पुरुषाला तारुण्य जड वाटतं.

**रंगेलः**—तरुणासंच काय ? एकीकडे अर्धांग गेलेल्या तर दुसरीकडे शरीर दुबळी झालेल्या–मान मोडलेली तर कमरेची कमान झालेल्या जरत्कारूलाहि नवोढेच्या नथणींतून प्रेमाचा कस लावून मदनाचे तीर मारावेसे वाटतात ! द्या टाळी.

**हेमंतः**—तुमच्याइकडे, तुमच्या परिचयाचे असे प्रेमसुकर करण्याचे मार्ग कोणते ?

**रंगेलः**—नेत्रांचा हटयोग. बाकी या सुधारलेल्या काळांत हा रोजमुऱ्याचा मार्ग होऊन राहिला आहे. तरी पण अमलांत आणून पहावा. आतां ओळ-

वरच आलं ह्मणून सांगतों. प्रेमाचीं हीं षड्दर्शनं आहेत. आराधनेची वक्तृत्व-कला. ज्योतीर्विलासादि मधुउन्मादाचे कटाक्ष. रोमांचित शरीराचं नाडीज्ञान, प्रणयाचा अमृतानुभव, मुक्यांचं आंकडेशास्त्र, व आलिंगनाची भूमिती.

**हेमंतः**—ही सर्व षड्दर्शनं माझ्यासारख्याच्या वाट्याला येतीलच असं नाहीं. सोपा आणि गुपित असा कांहीं मार्ग असल्यास सांगा बुवा. तुमच्यासारख्या प्रेमपंडिताचा मी कायमचा अंकित होऊन रहाण्यास तयार आहे.

**रंगेलः**—मी समजलों! माझी चेष्टा करतां! आज माझ्या प्रेमाला पान्हा फुटला आहे. अहो आजच्याआज मला कमींतकमी पांच दहा Love letters आलीं आहेत! खोटं नाहीं. अहो तुह्माला मुलगी नाहीं ह्मणून! नाहींतर तिचंसुद्धां ११ वं Love letter आलं असतं! प्रेमाच्या बाबतींत सर्वांत सोपा उपाय ह्मणजे प्रेमपत्रिकांची आयात निर्यात. आजकाल भरभराटीस आलेली अखिल प्रेमाची पेठ यामुळंच तेजींत आहे.

**हेमंतः**—तुमचं भाग्य किती थोर ह्मणून सांगू.

**रंगेलः**—तुह्मालासुद्धां असं वाटतं तर?

**हेमंतः**—प्रेमपत्रांचा धनी होण्याचं भाग्य फारच थोड्या तरुणांच्या वाट्यास येत असतं. प्रेमाच्या दिग्विजयाचा घोडा ह्मणून संचारायला तुमचीच एक लायखी दिसते.

**रंगेलः**—(खिशांतून पत्रांचं मोठं पाकीट काढतो) हें पाहिलंत. यांत एकजात प्रणयपत्रिका आहेत. थोरामोठ्यांच्या मी मी ह्मणणाऱ्या रमणीपासून तो आलतू फालतू पोरीपर्यंत ज्यांच्या ज्यांच्या माझ्यापाशीं ओळखी आहेत व ज्यांनीं ज्यांनीं मला नुसतं पाहिलं आहे, त्या सर्वांचं प्रेम या पाकिटांत आहे. अगदीं सतावून गेलों बुवा! (स्व.) मी किती थोर माणूस आहे, याचा परिणाम यांच्यावर झालाच एकूण. (उघड) कितीजणीं आत्महत्येला तयार झाल्या होत्या त्याची नोंद जर कुणाजवळ असेल तर ती माझ्याजवळ कित्येकांचे प्राण या पाकिटांत असल्यामुळं कित्येकजणी प्राणहीन स्थितींत असतील! प्रेमामुळं यमाची करणी करण्याचं जें नशिबीं येतं तें हें असं. इतके प्राण रोज हे असे खिशांत बाळगावे लागतात. कित्येकजणीचीं आज लग्नं झालीं आहेत, त्यांच्या नवऱ्यासमोर जर हीं पत्रं मांडलीं तर त्यांचे चेहरे कसे होतील सांगा पाहूं. खरं सांगा हं? हंसूं नका. खोटं वाटत असेल तर हीं पत्रें पहा. पहा बेलाशक

पहा. ( पुढकें हेमंताच्या हातांत देतो तो एकएक पाहूं लागतो. ) नीट पहा. मला केवढा मोठेपणा दिला जातो याचं प्रत्यंतर येईल. ( हेमंताला चित्रांगीचं पत्र त्यांत दिसतं. )

**हेमंतः**—( स्व. ) काय पहातों मी हें ? चित्रांगीचं पत्र. चित्रांगीसुद्धां इतर प्रणयिनीप्रमाणं आहे तर !

**रंगेलः**—काहो बिचकलांतसे ? तुमचं कांहीं लग्नबिग्न झालं आहेका ?

**हेमंतः**—नाहीं तसं कांहीं नाहीं. लग्न का करावं याचाच विचार चालला आहे. अहो कृपा करून एवढं हें पत्र मला देतां का ?

**रंगेलः**—अहो, दुसऱ्यांच्या प्रणयपत्रिकांवर कसली भूक भागवता ? ( पत्रें घेतो ) माझ्या या रेकॉर्डलाहि कमीपणा येईल. आतां त्या चित्रांगीचं उदईक लग्न व्हायचं आहे. तिच्या नवऱ्याला जर हें पत्र दिसलं तर काय बहार होणार आहे. पाहुंया लग्न तर आधीं होऊंदे ! तुह्माला तें पत्र तर मिळणार नाहींच. पण कायहो, तुह्मी वरपक्षाकडील वऱ्हाडी बिऱ्हाडी तर नाहीं ना ?

**हेमंतः**—मुख्य वऱ्हाडी. म्हणजे चित्रांगीचं ज्याच्याशीं लग्न उरकून टाकायचं आहे तो प्राणी हाच.

**रंगेलः**—( स्व. ) अरेरेरे. घात झाला. गणपती करतां करतां अखेर माकडच झालं वाटतं. ( उघड ) आतां असा विषाद मानूं नका. तसं पहावयाचं तर अगदीं मनानंहि पवित्र असं माणूस या स्त्रीयुगांत मिळायचंच नाहीं. शिवाय पत्रवाली चित्रांगी ती तुमची चित्रांगी नव्हे हो ! कायहो ! ते कंगालराव ते तुमचे चुलते, ते आमचे मामा. त्यांच्या सुंदर मुलीशीं माझंही लग्न व्हायचं आहे. त्यानां एक सुंदर मुलगी आहे, नाहीं ?

**हेमंतः**—त्यांना मूलबाळ कांहीं नाहीं.

**रंगेलः**—( स्व. ) म्हणजे मुलीच्या थापा मारून म्हाताऱ्यानं मला तोंडघशी पाडलं कीं काय ? माझ्याकडून आपलं कार्य उरकून घेतल्यावर मला दगा देण्याचा विचार होता तर ? ठीक आहे थेरड्या, मीहि आतां तुला तोंडघशी पाडतोंच ! ( उघड. ) बरं फार उशीर झाला. येतों तर. ( जातो )

**हेमंतः**—तें पत्र मला मिळालं असतं तर फार बरं झालं असतं. चित्रांगीची रंगेलला प्रणयपत्रिका ! माझ्या वाग्दत्त वधूच्या प्रेमाचं हें असलं प्रदर्शन ?

मस्तक कसं भणाणून जातं! मृत पितरांचं वचन पाळण्यासाठीं हीन शीलाच्या कुमारिकेशीं विवाहानं निगडीत होऊं? मृत पितरांचं वचन! त्यांना काय माहीत कीं श्रीरंगाची मुलगी बद्शीलाची निपजेल ह्मणून? पण माझ्या अखिल आयुष्याचेच रंग विचित्र आहेत. लग्नाला तरी दोष काय ह्मणून द्यावा? ठीक आहे. या माणसाजवळून तें पत्र हरतऱ्हांनीं मिळवतों आणि नंतर चित्रांगीला काय तें सांगतों. " न भूतो न भविष्यति " असली बेफाट कर्तबगारी करून दाखविल्याशिवाय या विचित्र पुण्यनगरींत आपला निभाव खास लागणार नाहीं. आजपर्यंत नवख्या कल्पनांचं काव्य, अहेतुक सौंदर्याच्या सहजदृष्टीनं पहात होतों, पण आतां वस्तुस्थितीच्या या कुरूप दर्शनानं डोळे गढून करून या जीवाला प्रत्यक्षाचा चिखलच दाखवावा लागणार आहे. ( जातो. )

---

## प्रवेश ३ रा.

( स्थळः—रस्ता. जानिवशाच्या बंगल्यासमोरचा. )

पात्रें: —रंगेलराव, कंगालराव.

**रंगेलरावः**—( स्व. ) कंगालरावाला मथवून जरा घटवला कीं कल्याणीला दत्तक घ्यायला ताबडतोब तयार होईल. आपल्या एका कल्पित सुंदर मुलीच्या नांवावर मला अजिबात पचनी पाडून आपलं लग्न उरकून घेण्याचा कपिराजांनीं कोकणी कावा योजला होता. याला टिचकीसरसा बेमालुम बनवला पाहिजे. याच्या मांडीवर कल्याणी दत्तक बसणार, नाहीं का? दत्तक बसल्यावर अर्थातच त्याच्या इस्टेटीला वारस होणार. ठीक आहे. अशाच रीतीनं गुलामाला फसवला पाहिजे. त्यानं एक बक्षिसपत्रहि तयार करून ठेवलं आहे, नाहीं का? त्याच्याशीं लग्न करणाऱ्या मुलीच्या नावानं इस्टेट करून देण्यासाठीं त्यानं तो कागद तयार करून खिशांत बाळगला आहे. तो कागद अचानक पसार करून शब्द सोडलेल्या जागीं कल्याणीचं नांव द्यावं ठोकून आणि घ्यावा रजिस्टर करून. मग बस ह्मणाव शंख करीत. स्त्रीच्या बाबतींत माझी झालेली फसवणूक मला खपणार नाहीं. बस्स. असंच करायचं! साहजिक कल्याणीचा फायदा होईल तो होईना कां! मी जरी सुंदर स्त्रियांच्या बाबतींत ढिला असलों तरी या कोकण्यांचं बारसं जेऊन बसलों आहे. मी बादळ्यासारखा वागतों याच्यावर जाऊं नकोस म्हणावं. हे ह्मातारे पैसे भरून वाटेल त्या सुंदर पोरी पटकावतात

आणि आह्मां तरुणांच्या वाट्यास काळ्या कुचकुचित खारकुंड्या ! काय विपरीत आचार घडतात पहा ! हे आले बुट्टोपंत ! काय तो सलकड्यांचा झोक ! काय ती बिकबाळी ! यावं श्वशूर !

**कंगालराव:**—( प्रवेश करून ) उद्यांचा बेत कायम आहे ना ?

**रंगेल:**—अगदीं बरहुकूम ! कंगालरावजी तुमचं नशीब मोठें जोरावर बुवा ! तुह्माला उद्यां एका सुंदर मुलीची प्राप्ती होणार ?

**कंगाल:**—ह्मणजे ? काय ह्मणतां काय ? शपथ ?

**रंगेल:**—अहो कल्याणी उद्यां तुमच्या मांडीवर बसणार !

**कंगाल:**—हॅः काय बोलतां ! अगदी शुद्ध खूळ.

**रंगेल:**—पण आपखुशीनं मिळत असली तर तुमची ना नाहीं ना ?

**कंगाल:**—अहो त्यासाठीं तर मी अगदीं हपापलोय. केव्हां एकदा घरांत " अगो " येईलसं झालं आहे.

**रंगेल:**—अहो ती " अगो " ह्मणून मिळायची नाहीं. तुह्माला दत्तक मुलगी ह्मणून मिळायची आहे.

**कंगाल:**—छेः छेः छेः—व्यवहार चुकला. ( जाऊं लागतो. )

**रंगेल:**—अहो, ऐका तर खरं—

**कंगाल:**—अहो, मी ह्या दत्तविधानांत गुंतल्यावर चटकन् अंतरपाट धरून कुणातरी मुलीशीं मला पटकन् लग्न कसं करून घेतां येणार ?

**रंगेल:**—अहो, दत्तविधानाची व लग्नाची वेळ जवळ जवळच आहे. उलट तुमच्या सोवळं नेसून बसण्याचा, तुमच्या लग्नांत फार उपयोग होणार आहे. आलं ना लक्षांत ?

**कंगाल:**—( स्वगत ) प्राण गेला तरी मी कल्याणीला मुलगी समजणार नाहीं. तरी पण याच्या या दत्तविधानाच्या बेताला नकार देण्यांतहि अर्थ नाहीं. हो. आयत्या वेळीं लग्नमंडपांत कुणी कुमारिका जवळपास फिरकल्या नाहींत तर आमच्या शुभमंगलाला मुलगी कुठून आणायची. व्यवहार नाहीं चुकतां कामा. ( उघड ) रंगेलराव, आहे तुमची दत्तविधानाची कल्पना आह्माला पसंत.

**रंगेल:**—ठीक आहे. जमलं तर.

**कंगालः**—हो. यस् ! तुह्मी माझ्याकरितां फार मेहनत घेतलीत बुवा ! पुढच्याच मुहूर्तावर तुह्माला मी माझे जावई करतों नी काय, मी मोठा व्यवहार-चतुर माणूस आहें. एकदा ठरलं तें ठरलं.

**रंगेलः**—तें सारं मला कबूल आहे. पण उद्यां अगदीं तयारीनं असा हां ! भट एकदम मंगलाष्टकं ह्मणूं लागतील त्यावेळेस तुम्हीं माळ घालायला तत्पर असलं पाहिजे. एकदां माळ पडली कीं काय, लग्न कायम.

**कंगालः**—होय ना, तें माझं काम. एकदां लग्न होऊं द्या हो. ह्मणजे आह्मीं दोघं व तुम्हीं दोघं. अगदीं चैनींत राहूं. कोकणांत आमच घर केवढं आहे ! शिवाय एक डोंगरहि आहे. बरं तर. जमलं. वाः उत्तम ! काय योगा-योग ! पुतण्याच्या लग्नांत माझं लग्न आणि माझ्या लग्नांत तुमचं लग्न. आपली दोन लग्नं ठरून गेलीं वाहवा ! चला. [ जातात. ]

---

## प्रवेश चौथा.

( स्थळः—लग्नमंडप. एका बाजूला बोहलें, स्थंडील वगैरे लग्नाची तयारी, दुसऱ्या बाजूला दत्तहोमाची तयारी )

पात्रें:—हेमंत, कंगाल, श्रीरंग, रंगेल, बिहारी, बिशीर, चिमणभट. नंदिनी, कल्याणी, चित्रांगी, वृंदा वगैरे )

**श्रीरंगः**—हां भटजी, अशी पंजाबमेल नको बुवा ! या मंत्राच्या मेल-गाडीतून हिंदु धर्माला मक्कामदिनाच्या मशिदींत नेऊन पोंचवूं नका ! तुम्हाला कितीदां सांगायचं ?

**बजंभटः**—अहो, पण उशीर लागल्यास मुहूर्त टळेल ना ?

**कंगालः**—( चिमणभटास एकीकडे ) भटजी तयार असा हां, मुहूर्तांची वेळ जवळ येत चालली. कुणी मुलगी इकडे फिरकली रे फिरकली, कीं चटकन अंतरपाट धरून पटकन मंगलाष्टकांना सुरवात करा.

**चिमणः**—गडबड करूं नका ! गडबड करूं नका ! अंतरपाट अगदीं हातांत धरून तयार आहें. मारामारीची वेळ आली तर भय्ये तयार आहेत ना ?

**कंगालः**—सर्व कडेकोट तयारी आहे ( स्वगत ) भय्या, म्हणजे काय ? कोकणांत हा पदार्थ ऐकला नाहीं.

**श्रीरंगः**—चिमणभट, झाली का दत्तविधानाची तयारी ?



**कल्याणीः**—बाबासाहेब,...माझ्या सर्वच प्रश्नाला उत्तर देते कीं, मला मुळी लग्नच करायचें नाहीं.

पृ. ६२

**जानू**:--माजा बक्षिसाचा मुडासा पर जाताय काय जनू ?

**रंगेल**:--( स्व. ) वा जी वा ! सर्वांचे सोळा आणे दात पडले.

**श्रीरंग**:--कल्याणी, तुझा तर्क तरी काय चालतो.

**कल्याणी**:--उजाडत तिच्या हातांत एकदोन पत्रें व कांहीं पुस्तकं मिळालीं. बहुधा "स्त्री-स्वराज्य अविवाहित संघाच्या" Pamphlet चा हा घातुक परिणाम असेल ! तें पुस्तक आजच तिच्या हातांत पडल असाव.

**हेमंत**:—( स्वगत ) माझ्या कठोर पत्राचाच हा परिणाम ! मी केलं हें योग्य कीं अयोग्य ?

**नंदिनी**:—( रडत ) पाहिलंत, हा आपल्या लाडाचा, शिक्षणाचा, परिणाम ? यापुढं जगांत तोंडसुद्धां दाखवायला नको. हें सारं स्त्रीशिक्षण, सुधारणा, प्रौढविवाह बरं !

**शिशीर**:—बाबासाहेब, आपल्या बेफाट मुलीलाच हें वर्तन शोभतं.

**बिहारी**:—बायकांना पायांतल्या वहाणेप्रमाणं जिथल्यातिथं ठेवलें पाहिजे ! नाहींतर अस्सा धुमाकुळ माजतो. जग कोणत्या थराला जाणार आहे कोण जाणे,

**वृंदा**:—( स्व. ) तरी मला वाटलंच, या पुरुषांची असली बेमुर्वतखोरी दिसून आल्यावर ही चित्रांगी लग्नाला तरी कशी तयार झाली.

**रंगेल**:—( स्व. ) तिचं मन माझ्यावर बसलं आहे कीं काय कोण जाणें ! तिच्या खोलीशीं जाऊन विचारूं का बाहेरून ?

**नंदिनी**:—( श्रीरंगास ) ऐकलं का ? जा. तिची समजूत घालून घेऊन या. ऐकलं तर ती आपलंच ऐकेल.

**श्रीरंग**:—( स्व. ) चित्रांगीसारखी विचारी मुलगी असल्या प्रसंगांतहि इतक्या बेफाम तऱ्हेनं कां वागली असावी याचं कारणहि तितकंच खोल असावं ! अशा वेळीं ती माझंहि ऐकेल कीं नाहीं कोण जाणे ! कांहीं सुचत नाहीं.

**शिशीर**:—बाबासाहेब, काय ही आपली स्तिमित वृत्ती ! जा तिला घेऊन या.

**श्रीरंग**:—कल्याणी, जा माझा निरोप सांग.

**कल्याणी**:—तुमच्या अवज्ञेचा पहिलाच प्रसंग आहे, पण माझ्यानं तें होणार नाहीं. तिच्या शब्दावरून तिचा निश्चय ढळणार नाहीं हें स्पष्ट दिसतं

**श्रीरंगः**—चला आपण सर्वजणच जाऊं आणि तिची समजूत घालूं. ( जातात )

**रंगेलः**—( स्व. ) भिंतीवरून आंत उडी मारण्याची वेळ आली तरी आपली तयारी असावी ! ( कोट काढून ठेवतो व जातो. )

**जानूः**—( स्व. ) पिकांव, पावडही घेऊन गेला पाहिजे. वखत आला तर भींत पाहूनशान न्होवरीला आनावी लागलना! ( जातो )

**कंगालः**—( स्व. ) अहाहा. सर्वच जावयाला निघाले. अशांत जर का एखादी मुलगी इकडे फिरकेल तर पटकन् लग्न लावून घेईन.

**बिहारीः**—( स्व. ) या चोरानें कोट काढून ठेवला आहे नाहीं का ? त्याच्या खिशांत वृंदेन पाठविलेलीं चोरटीं पत्रं आहेत कीं नाहींत तें पहावं ! लग्नाच्या गडबडींत वाटेल त्या वस्तूची बिनबोभाट चोरी करावी ! डोळे, मन, प्रेम अगदीं वाटेल तें वाटेल त्या जागीं चोरावं. लक्ष द्यावयाला कुणाला म्हणून सवड असायचीच नाहीं ( उघड ) वाटेंतच कोट टाकून गेला ( रंगेलच्या कोटांतून पत्रांचें पुडकें काढतो. हेमंत हें सर्व पहातो. )

**हेमंतः**—( घाईनें उठून बिहारीस ) हें पहा, त्यांतलं मला एकच पत्र घ्यायचं आहे. बाकीचीं सर्व तुम्हीं ठेवा. पत्र माझंच आहे, पण तें रंगेलजवळ रहातां उपयोगी नाहीं म्हणून मला पाहिजे.

**बिहारीः**—घ्या लवकर काढून ( हेमंत चित्रांगीचं पत्र काढून घेतो. ) बोलायचं नाहीं बरं ( हेमंत पाटावर जाऊन बसतो. बिहारी पुडकं खिशांत ठेवून जातो. )

**कंगालः**—( स्व. ) पैशापरी पैसे गेले आणि लग्न नाहीं तें नाहींच. एक चित्रांगी न आल्यामुळं माझं लग्न मात्र राहिलं. पण वाईट वाटतं आहे दोघांना ! मला व माझ्या पुतण्याला. दत्तविधानाचीहि पोरगी आणित नाहींत. त्या मुलीकडे प्रथम पासूनच मी मुलीच्या दृष्टीनं कधींच पाहिलं नाहीं. यस रे यस ! दत्त-विधानाकरितां येणाऱ्या कल्याणीशींच लग्न उरकून घेतलं तर ? बायको तर लाभेलना ? काय पण व्यवहार अचानक सुचला ? कल्याणी मिळाल्यावर रंगेलचाहि मी मिंधा नाहीं. त्यानं आणलेलं सावज हुकलं त्याला मी काय करणार ? ( उघड ) भटजी, आणखी पांच पन्नास रुपये घ्या. पण असं करा.

**चिमणः**—कसं करूं ?

**कंगालः**—पहिला बेत फसलाच. तेव्हां आतां दत्तविधानाच्या वेळेसच कल्याणीशींच माझं लग्न उरकून घ्या ह्मणजे बेश! ठीक होईल! मनासारखं होईल! मला "अगो" होईल. एवढी दया करा हो.

**चिमणः**—आमची बिलकूल हरकत नाहीं. पण–तेवढी सलकडीं द्या. आतां द्या. अगदीं या वेळीं!

**कंगालः**—( स्व. ) व्यवहारी माणूस केव्हां फसत नसतो! ही संधी दोघांनाहि सोन्यासारखी आहे. सलकडीं पाहिजेत. घे. सांगून सवरून पितळेचींच आहेत. सोन्याचीं घालतो कोण उगीच झिजायला! ( सलकडीं देतो. )

**हेमंतः**—( स्व. ) हातांत पुरावा मिळाला! स्वतःच्या लग्नाला मी आलों कीं ललाटलिपीच्या अक्षरांत लिहिलेली ही स्वतःची विडंबना पहाण्याकरितां आलों? असली ही सुधारणा ह्मणजे समाजाशीं माजविलेलें अव्यवस्थित वैर अशी माझी बालंबाल खात्री पटत चालली आहे. एकीकडे बालविवाह तर दुसरीकडे विडंबित प्रौढ विवाह; एकीकडे विधवांचे पुनर्विवाह तर दुसरीकडे त्यांना दिल्या जाणाऱ्या सन्यासदीक्षेचा भयानक आक्रोश. एकीकडे कुरूपतेनं सौन्दर्याला घातलेली लग्नमिठी तर दुसरीकडे सौन्दर्याकरितां धडपडत असणाऱ्या गरीब शीलवंतांचा आत्मघात. संपत्तीहीन पण सुरस प्रेमाची सौंदर्यानं केलेली सैतानी वंचना एक घरांत, तर दुसरीकडे गरीब साध्याभोळ्या अबलेशीं छाकट्या तरुणानं केलेले कृष्णकामाचार! अरेरे या साऱ्या बंडखोर दुर्वर्तनाशीं एकजीव झालेला तोच आमचा समाज व तीच आमची सुधारणा! लग्न उरकून असल्या समाजाचा एक घटक ह्मणवून घेण्यापेक्षां–पण माझं या लग्नमंडपांत होत असलेलं लग्न कीं स्वप्न! असंख्य गोळयांचीहि परवा नसणारा लढाऊ घोडा साध्या चाबकाच्या एका फटकाऱ्यानंच बेफाम होतो. या विडंबनेनं मला पूर्ण जागृति आली आहे. ( बिहारी येतो. )

**बिहारीः**—हेमंतराव, आपल्याबद्दल मला अत्यंत खेद होत आहे. चित्रांगी आमच्या सर्वांच्या प्रश्नाला अंतून उत्तरहि देत नाहीं. ( शिशीर येतो. )

**शिशीरः**—माझ्याप्रमाणंच तुह्मालाहि प्रेमनकार मिळाल्यामुळं समदुःखी ह्मणून मला आपल्याबद्दल कळकळीची सहानुभूति वाटते. आपल्या लग्नांत असलें घोटाळे माजावे ह्मणजे दुर्दैव!

**श्रीरंग:**—( प्रवेश करून ) हेमंत, काय बोलावं हेंच मला समजत नाहीं. तुझी कींव करूं कीं स्वतःची व चित्रांगीची करूं ? स्थितप्रज्ञ डळमळून जाण्याचा हा पहिला प्रसंग आहे. तरी पण या प्रसंगामुळं मी आपलं, खऱ्या आनंदानं अभिनंदन करतों.

**जानू:**—(प्रवेश करून) ओ न्होवऱ्यानु. माझा बाबा तो ! मिलल मिलल हो तुमासनी न्होवरी !

**शिशीर:**—बाबासाहेब,अभिनंदन करण्याइतका हा थट्टेचा प्रकार आहे होय ?

**श्रीरंग:**— तुला शंका वाटते ? जनलोकांना दुःखी बनविणारे प्रसंग हेच खरे अभिनंदनीय असतात. जनलोकांच जें दुःख तेंच विचारवंतांच्या तत्वज्ञानाला कारणीभूत होत असतं

**रंगेल:**—हेमंतराव, I am so sad. Let me console you. फारच शोकपर्यवसायी गोष्ट ! माझी दिलापासून सहानुभूती !

**जानू:**— काय ही बामन नेमळी येवास ठावा ! न्होवरी येत नाहीं झंजी काय ? मंग ग्येलांव कशालां आनू आलांव कशाला ? पेटलां तुमचा झोरा नायता !

**हेमंत:**—( स्वगत ) आपल्या उज्वल प्रकाशानं तळपत असतानां ज्या सूर्याकडे पहाण्याकरितां मान वर होऊं शकत नाहीं, त्याच सूर्याला ग्रहण लागल्यावर प्रत्येक मनुष्य त्याच्या हीन अवस्थेचा फायदा घेऊन टवकारून पहाण्याकरितां यत्किंचित् कांचेचीहि मदत घेऊं लागतो. सुखाच्या वेळीं सहानुभूती दाखविण्याचा प्रयत्न कोणीहि करीत नसतो, मात्र दुःखाच्या वेळीं सहानुभूतीचा आव आणून हिनवणीचे प्रयत्न करून चालले असतात ते हे असे ! आमच्या आजच्या समाजाचं हें एक छोटं चित्र आहे. दर पळागणिक चेष्टा ! ! ( उघड ) बाबासाहेब, तुमच्याप्रमाणंच मलाहि आनंद वाटतो. मुलगा असावा तर असा नशीबवान असावा ( स्वतःची पाठ थोपटतो. )

**शिशीर:**—तुम्हांला दुःख होत नाहीं ? मला तर हें दुर्दैव वाटतं !

**हेमंत:**—आणखी काय काय वाटतं ?

**रंगेल:**—या प्रसंगात थोडीशी Tragic humour आहे ! तुमच्या स्थितीबद्दल जितकें वाईट वाटतं तितकंच हसूं येत आहे.

**हेमंतः**—( स्व. ) या सर्वांला कारणीभूत हाच माणस ( उघड. ) बाबासाहेब या पशुतुल्य माणसाच्या कींवेचा विषय होण्यापेक्षां मला जाणंच श्रेयस्कर वाटतं ( जातो. )

**श्रीरंगः**—या तुमच्या सहानुभूतीच्या माऱ्यानं दुखावलेल्या भावनाखचित हृदयाचा दुःखावेग मात्र दुणावत असतो. अरे या गोष्टी–मानवी स्वभावाचे हे नाजूक धागे–तुह्माला समजणार तरी केव्हां ? रंगेलराव, तेवढ्यांतल्या तेवढ्यांत जानिवशाच्या बंगल्यातहि जाऊन आलांत ? तिकडे ही हकीगत कळविलीत कीं काय ?

**रंगेलः**—छेः छेः माझा हातरुमाल राहिला होता तो आणला. ( स्वगत ) कंगालच्या खिशांतून बक्षिसपत्र आणायला बरा वेळ मिळाला. दत्तविधानाच्या वेळीं घ्यावयाचा सूड उगवून नी काय ? ( उघड ) माझा कोट कुठं आहे. (अंगांत कोट घालतो ) बाबासाहेब, लग्न नाहीं तर नाहीं. पण कल्याणीचं दत्तविधान घ्या उरकून !

**कंगालः**—( स्व. ) आतां येणार तर कल्याणी ! ( उघड ) भटजी, तयार असा हां.

**चिमणः**—केव्हांपासून तयार आहे. परंतु आमच्या तयारीच्या गरजेचीच वेळ येत नाहीं.

**शिशीरः**—बोलावू ना कल्याणीला बाबासाहेब ? दत्तविधान तरी ठेवूं नका. मग आयत्या वेळीं ह्मातारा कुठून मिळणार.

**कंगालः**—( स्व. ) मला ह्मातारा ह्मणतोस नाहीं ? थांब गुलामा, लग्न झाल्यावर सांगतो.

**श्रीरंगः**—माझं मन ठिकाणावर नाहीं. तुह्मींच वाटेल तसं उरकून घ्या. ( जातात. )

**बिहारीः**—( स्व. ) मलाहि तीं पत्रं तपासून पहावयाचीं आहेत. आंघोळीच्या खोलींत जाऊन बसतों ( जातो. )

**शिशीरः**—कल्याणी अजून येत नाहीं ह्मणजे काय ? तिची समजूत करून आणली पाहिजे ( जातो. )

**कंगालः**—अहो रंगेलराव, आणा कोणीतरी मुलगी लवकर. कोणीहि असली तरी चालेल. मात्र मुलगी पाहिजे.

**रंगेल**:—भटजी, तुह्मीं जशी मेहुणाच्या दक्षणेला वाटेल त्या बोला घेऊन जातां तशातलें कांहीं यांच्या बाबतींत करा.

( कल्याणी व शिशीर येतात. )

**शिशीर**:—लाडके, घे एकदां दत्तविधान उरकून ह्मणजे मग धर्मदंडाची तरी आडकाठी रहाणार नाहीं.

**कल्याणी**:—लाडके ? शरम नाहीं वाटत ? माझं मनच मुळीं विटून गेलं आहे.

**कंगाल**:—कल्याणी, ये बरं. एकदां उरकूं दे मंगलविधी ! आमची अवज्ञा करूं नये.

**कल्याणी**:—आपल्याला फार त्रास झाला. इतक्या त्रासानंतरहि त्रास घेतल्याचं समाधान मिळावं ह्मणूनच केवळ आपली अवज्ञा करीत नाहीं. ( होमाजवळ पाटावर उभी रहाते. ) ( कंगाल पाट फिरवून समोरा समोर उभा रहातो. )

**कंगाल**:—( भटजीस एकीकडे ) हां भटजी अंतरपाट !

**जानू**:—आंः ! अंतरपाट ! म्हंजी दत्तइधान होतांय कां लगीन लागतांय ? कायबीं हेलमेल हाय. ताईसायबास्नी सांगाया व्होवा ( धांवत जातो. ) ( भटजी मंत्र म्हणूं लागतात. )

**रंगेल**:—( स्व. ) ह्मणजे यांचा बेत तरी काय आहे. कल्याणीशीं लग्न लावणार कीं काय ? बरोबर आलं माझ्या लक्षांत. म्हातारा ती नाहीं तर ही बायको पटकवणार ! आतां मात्र कहर झाला व्यवहारी वृत्तीचा ( मंगलाष्टकांना सुरुवात होते. )

**कल्याणी**:—( चपापून ) अग बाई हें काय ?

**शिशीर**:—भटुरड्यानों, हें काय आरंभलं आहांत ( इतक्यांत चित्रांगी व मागून जानू येतात. ती अंतरपाट उडवून टाकते. )

**चित्रांगी**:—थेरडोपंत, हा कितव्यांदा विवाह ? काका, नेभळया नादाना-सारखें आं करून पहात बसलांत ? रंगेलराव हा प्रकार काय आहे ?

**कंगाल**:—हे भटजी काय भ्रमांत होते कीं काय ? अरे रांडेच्यानो, दत्त-विधानाचे मंत्र ह्मणायचे कीं लग्नाचीं मंगलाष्टकं.

**रंगेलः**—पाहिलं ! संस्कृत येत नसलं म्हणजे असं होतं. पाजी माणसा, लाज नाहीं वाटत तोंड काढून बोलायला ? गप्प बसतोस कीं—

**कंगालः**—माफ कर बाबा, पण दत्तविधान कुठं झालं आहे ?

**कल्याणीः**—असं ! लग्न उरकायला पाहिजे नाहीं. द्या यांना पोलीसच्या ताब्यांत !

**रंगेलः**—कल्याणी yon hear me a bit ( बक्षिसपत्राचा कागद काढतो) वाच हा. या कागदावर या जागीं तुमचं नांव घालून घ्यायचं आणि रजिस्टर करायचा !

**कंगालः**—( स्व ) माझ्या सहीच हें बक्षिसपत्र कीं काय ? व्यवहार घसरलाच ! रंगेलला मी दाखविलं पण - माझा घात झाला. स्वतःची अक्कल स्वतःला भोंवली.

**कल्याणीः**—या ज्ञातान्याच्या पापाला हेंच प्रायश्चित. जरठदेवा, आपली कल्याणी ही मुलगी समजून सर्व इस्टेट लिहून देतां कीं केल्या गुन्ह्याबद्दल तुरुंग पाहिजे.

**रंगेलः**—कोंकणच्या कविराजा बोल ! तुला हा रंगेल सवाल करतो आहे कीं–चला हें घ्या फाऊंटन पेन व आपल्या हातानं " कल्याणी माझी दत्तक मुलगी असे शब्द लिहा. वेळ घालविण्यांत अर्थ नाहीं. तुरुंग आपला जबडा "आ ' करून उभा आहे.

( कंगाल रडतो. ते शब्द लिहून कागद परत देतो.)

**चित्रांगीः**—भटजी, आतां रीतसर दत्तविधान उरका. शिशीर काका व रंगेलराव तुम्ही साक्ष रहा.

**जानूः**—अव थोरल्यान् , इष्टान् बी सटाकली, अन् मुलगी बी निसाटली आतां मुलकांत जातांव काय ?

**रंगेलः**—कंगालराव, आपल्याला एक मुलगी आहे, या खोट्या थापेवर मला झुरवलंत त्यांचं हें प्रायश्चित्त !

**कंगालः**—माझा सोन्यासारखा गांव सोडून कशाला आलों या भिकार शहरात कुणाला ठाऊक. माझं सर्वस्व फिरावून घेतलंत हो ( स्व. ) बाकी या शहरी गाढवांना तरी कुठ ठाऊक आहे कीं माझी सर्व इस्टेट तीन जणाकडे त्रिवार गहाण आहे.

**शिशीरः**—हां चुप. दत्तविधानाला होऊं द्या सुरवात.

**चित्रांगीः**—कंगालजी आतां परत लग्नाचं असं नांवहि काढूं नका. आलं ना ध्यानांत ?

**कंगालः**—हिणव, हिणव. सांपडलों आहे खरा तुझ्या हातांत ! लग्न नाहीं तें नाहींच ( रडत ) नाहीं म्हणायला लग्नाशिवाय एक मुलगी मात्र मला झाली.

**भटजीः**—( कंगालास एकीकडे ) तरी मी तुम्हाला सांगत होतों. भट्टे, तयार असते तर जबरीचा विवाह लागून नसता का गेला ? आतां गप्प रहा. हं, करा आचमन ! श्रीगणेशाय नमः

**रंगेलः**—( हॅट काढून वेडावतो. ) कंगाल ! !

अंक दुसरा समाप्त.

*

# अंक तिसरा



## प्रवेश पहिला

( **स्थळ**:—दिवाणखाना. पानसुपारीचा डबा उघडून श्रीरंग पान खात आहे. जवळ नंदिनी बसली आहे. जानू मागच्या कोपऱ्यांत बसला आहे !)

**श्रीरंग**:—आपल्या मुलीचे चांगले कान उपटायच्याऐवजीं तिच्या बापावर राग धरून बसायचं हा कुठला न्याय ?

**नंदिनी**:—तिला जर लहानपणापासून अशी लाडूबाई करून ठेवली नसती तर असं झालं असतं का ? मुलगी म्हणजे परक्याची ठेव.

**श्रीरंग**:—चुकलं खरं ! पुढं तिला खव्याळ सासू, भांडकुदळ नणंदा जावा, आचरट आणि संतापी नवरा मिळणार असं समजून पहिल्यापासून मारे तरवारीच्या धारेवर धरली पाहिजे होती. पण आतां काय त्याचं ? चूक निस्तरायला तर पाहिजेना ? आणि त्याच प्रयत्नांत मी आहे. जानू जानू. हें पत्र घेऊन जा आणि त्या जानीवशाच्या बंगल्यात हेमंतराव—म्हणजे आमचे जावई त्यांना नेऊन दे ( पत्र देतो ) काय समजलं ? कुणाला देणार ? आमचे जावई ते त्यांना—

**जानू**:—तात्यानू हेरीच काय इचारताय हां—तुमी बामन शेनी शेनी म्हणतांव पर लगीन व्हगाडालां तरी त्या हेमनला जावई जावई कशापायी म्हणतांव व्हो ? मी आपला पतार घेऊन जातां, पर मी काय पोष्टया कागदवाला हाय काय ? हां काम माझा नाय. तात्यानू अस बगा—या शेरांत मना सुधारत नाय ! सकाळ धरना फिरून सुद्धा मना बाजार गवसत नाय. तात्यानू मी लई कंटाललाय. मना मुलकात जाऊ द्या एकदा, हत काय आकडी नाय, कोयती नाय, नांगोर नाय, डोंगर नाय, कारभारीण नाय, गुरवीन नाय, आन मिरासीन नाय मुळी कामच नाय मना ! आजच्यान पाठवताय काय ?

**श्रीरंग**:—आधीं पत्र देऊन ये जा. त्यांना सांग उभ्या उभ्या येऊन जा. नाहीं तर तिथच बोलत बससील हां.

**जानूः**—जाताय. पर योक योक हायत्यांतला पान घ्या. ( पान देतो. ) आन योक सुपारी ( सु. देतो. ) किती नखभर कात. वाइच हाय नाय. ( का. देतो. ) आता काय तमाखू शिवाय जाव व्हय ? ( तंबाखू देतो. ) तात्यानू लग्नाचा काय घ्येलाव नाय हां ?

**श्रीरंगः**— अरे लग्न झालय कुठं ? जा.

**जानूः**—असा काय हा तात्यानू ? नायपर असा काय ? निंगता मुरूत ठरला तिथ तो बसला आन घसरला व्हय ? लय घसरला का अजून हाय ?

**श्रीरंगः**—जातोस की नाहीं. ( जानू जातो. )

**नंदिनीः**—जावयांना बोलावून विचारण्यापेक्षां चित्रेलाच विचारणं अधीक बरं नाहीं का ? मला तर अगदीं मेल्यापेक्षां मेलं वाटतं. चित्रेला काय करूं नि काय नको असं झालंय.

**श्रीरंगः**—फुंकणी आहेच तुझी हातीं घेऊन चित्रेला चांगली नरम कर. वरवंटा, मुसळ, असलीं आयुधें तुमच्या शस्त्रागारांत असल्यावर मग काय ?

**नंदिनीः**—हेंच बोलायचं ना. मग मी आपली जातेच कशी.

**श्रीरंगः**—जा चित्रांगीला घेऊन ये. तिला आपण स्पष्टच विचारूं (!) तो हेमंत येतोच आहे. अजून तिची त्याची भेट झाली नाहीं हें बरं, नाहींतर अग्नीचाच पाऊस पडला असता. चित्रेची स्वारी निघाली होती हेमंतरावाकडे, पण मीच तिला मागें परतवली. जा पाहूं तिला बोलाव.

**नंदिनीः**—जाते आपली ! पण माझ्यावर एवढं तोंड सोडील. पण आलीच ही.

( केस मोकळे सोडले आहेत अशी त्रस्त मुद्रेनें चित्रांगी प्रवेश करते. )

**श्रीरंगः**—बाळ अशी जवळ येऊन बैस. आणि शांत चित्तानें सांग पाहूं.

**चित्रांगीः**—( बसून ) बाबा, माझ्यासारख्या कुमारिकेनें अशाप्रसंगीं बेमुर्वतीनें लग्न मोडणें हें लांछन आहे हें मला उमजतं पण मी तरी काय करूं ? माझ्या स्वाभिमानाचा खून पाडणाऱ्यांच्या जवळ वैवाहिक बंधनानें निगडित होणें हें आपल्याला तरी आवडेल का ? दैव दुष्प्रथीचा कुयोग टळला असं म्हणावं लागतं. जग माझ्याकडे बोटें दाखवून डोळे मोडील पण त्याला माझा काय इलाज ?

**श्रीरंगः**—म्हणजे असं झालं काय ? हेमंतरावांनीं तुझा अपमान करायला तुझी भेट तरी केव्हां झाली ? त्यांनीं असें केलें तरी काय ?

**चित्रांगीः**—काय करायचं ठेवलं असं विचारा ? विचारपावित्र्य व तदनुरूप राहणी हेंच आम्हा स्त्री वर्गाचें आवडतं जीवन. त्याच विचारपावित्र्याला प्रणयिनीच्या माकडचेष्टा संबोधणं याला आपण काय म्हणाल ?

**श्रीरंगः**—हेमंतरावानें हा गुन्हा केला ? छे. हेमंतरावाची तुला पारखच झालेली नाहीं.

**चित्रांगीः**—बाबा, असं बोलल्यावर तुमचा खरोखर राग येतो. माझ्यापेक्षा त्यांच्यावर तुमचा जास्त विश्वास होय ? दुरून पाहणाराला प्रत्येक चित्र मोहक आहे असें वाटतें, पण जवळून पाहतांक्षणीच चितान्याच्या फसव्या कसबाची कींव येत असते. तुमचे ते हेमंतराव नादान आहेत !

**श्रीरंगः**—चूप ! माझ्या उदासीनतेंत आणखी, तुझ्या बद्दलच्या तिरस्काराची भर घालूं नको.

**चित्रांगीः**—( उठून उभी रहाते ) बाबा फिरून सांगते, हेमंतराव नादान आहेत नादान !

**श्रीरंगः**—तूं इथून निघून जा. संतापाचा पारा प्रशांत झाल्यावर फिरून ये, आणि माझं समाधान कर.

**चित्रांगीः**—त्यापेक्षां एकाच आज्ञेच्या शब्दानं सांगा कीं त्यांच्याशींच लग्न कर म्हणून. ही चित्रांगी आपला स्त्रीजातीचा गूण, जाज्वल्य स्वाभिमान, बुद्धिवाद वगैरे चटसार गुंडाळून ठेवून आपण सांगाल त्या ठोंब्याशीं लग्न लावायला फिरून तयार आहे.

**श्रीरंगः**—हेमंतानं तुझं काय घोडं मारलं आहे तें स्पष्ट शब्दांत सांगशील ?

**चित्रांगीः**—एकदां कां दहादां सांगेन. मी "चोरून प्रेमपत्र पाठवीत असतें" अशा तऱ्हेचा अरेरावी आरोप करणारे इब्लीस म्हणजेच तुमचे हेमंतराव.

**श्रीरंगः**—छे, छे, हेमंत असं करीलसें मला वाटत नाहीं. हें तुला खोटंच कुणीतरी दुष्टाव्यान सांगितलं नसेल कशावरून ?

**चित्रांगीः**—या तोंडच्या गप्पा नाहींत ! लेखी पुराव्यानिशीं हेमंतरावांनीं आपला नादानपणा माझ्या निदर्शनास आणला. हें पहा हेमंतरावांनीं मला पाठवलेलें पत्र ( पत्र दाखवते ) बाबा तुमची न्यायबुद्धि जर जिवंत असेल

तर खोटे आरोप करून बदनामी केल्याबद्दल या नवरदेवांना येरवड्याचा लग्न-मंडप दाखवाल अशी मला खात्री वाटते.

**श्रीरंगः**—( पत्र पाहून ) हें पत्र हेमंतरावांनींच लिहिलं काय ? ( हेमंत येतो. नंदिनी जाते. )

**हेमंतः**—होय बाबासाहेब, ह्या पत्राचा लेखक हा हेमंतच आहे. चित्रांगीशीं लग्न लावण्याची माझी मुळींच इच्छा नाहीं.

**चित्रांगीः**—मग सोवळं नेसून बुभुक्षितासारखे बोहल्यावर कशाला येऊन बसलांत ? द्राक्ष आंबट ह्मणणारे तुमच्यासारखे जंबुक समाजांत पुष्कळ आढळतात.

**हेमंतः**—लग्न एकाशीं आणि प्रेम भलत्याशीं अशा तुझ्यासारख्या चवचाल मैनाहि कित्येक दिसतात.

**श्रीरंगः**—शिव शिव ! काय ऐकतों आहे ! हा आरोप जर खरा असेल तर तुमचं लग्न राहिल्याबद्दल मला फारच आनंद वाटतो. प्रेमपत्रें पाठवणारा उजवा हात दुसऱ्याच्या ताब्यांत गेल्यावर थोट्या मुलीशीं कोण लग्न लावणार ? उजवा हात नसलेला लेखक आणि प्रेमानं परागंदा बनलेली जिवंत स्त्री यांत पहिल्याचा लेखनसंसार आणि दुसरीचा वैवाहिक संसार अगदीं मढ्याप्रमाणं मेलेला चालायचा. लग्नाचा प्रसंग येऊन माझ्या मुलीचं हें दिव्य चित्र मला दिसलं नसतं तर फार बरं झालं असतं !

**चित्रांगीः**—असल्या निर्बुद्ध जगाबरोबर माता पितरेंहि आंधळीं बनून स्वतःच्या मुलांकडेहि जिव्हाळ्याची होळी झाल्या उजेडानं पहाण्याची तयारी करतात ! अरेरे, मायेनं थबथबलेलीं हृदयेंहि वक्रविचारी जगाच्या एकसुरांत री ओढूं लागतात यासारखं दुसरं करुण चित्र तें कोणतं ?

**श्रीरंगः**—अग पोरी, पण असा त्रागा करून घेण्यापेक्षां असला आरोप करायला तुमच्याजवळ पुरावा काय आहे असं त्यांनां स्पष्टच विचार.

**हेमंतः**—माझ्या कृतीचं समर्थनच करायचं तर भरपूर पुरावा आहे. मात्र तुझ्या वडलांकडे पाहून इतकं निष्ठूर व्हावं असं मला वाटत नाहीं.

**चित्रांगीः**—स्वतःच्या उदात्ततेचा नको इतका आविर्भाव करायला ! तुमच्यासारख्या मूर्ख प्राण्याला या ठिकाणीं बसायला तरी मिळालं हेंच तुमचं आजपर्यंतच्या जगण्याचं श्रेष्ठ पारितोषक !



**हेमंतः**—हें पहा आपलं प्रेममांगल्य !
**चित्रांगीः**—हाच पुरावा तर !

पृ. ७५

**हेमंतः**—बुद्धीची घमेंड मारणाऱ्या तुझ्यासारख्या बाहुल्या अशा ठकज्यावर येत असतात. हे पहा आपलं प्रेममांगल्य ( पत्र काढून तिच्या अंगावर फेकतो ).

**चित्रांगीः**—( पत्र वाचून ) हाच पुरावा तर. ( हंसते ) वा ! बहार केलीत बरं ! असलीं पाच पन्नास पत्रं बनावट करून आणायचीं कीं नाहीं ? रंगेलरावांना मी पाठवलेलं पत्र, बाबा, बाबा, पहा, या बुद्धीमंदाचं कौतुक करा बरं का ! हें पत्र वाचून याना गद्धेपंचविशीचा अमरपट्टा लिहून द्या. ( पत्र श्रीरंगाला देते )

**श्रीरंगः**—हेमंतराव हें अक्षर माझ्या चित्रेचं खास नव्हे. माझ्यावर विश्वास आहे ना ?

**हेमंतः**—बाबासाहेब, हें पत्र रंगेलरावानीं मला सहज दाखवलं, तिनंच त्यांना पाठवलं.

**श्रीरंगः**—रंगेलरावांना होय ? त्या मूर्खाला Love Letter पाठवणाऱ्या स्त्रियांची पैदास अजून जगाच्या पाठीवर व्हायची आहे. हेमंतराव तुम्हाला त्या गृहस्थाची रियासद अजून माहीत नाहीं. प्रेम प्रेम म्हणून उगाच पागल बनायची नवीन इंग्रजी रूढी आचरणांत आणणाऱ्या तरूण जगांतला तो एक नमुनेदार प्राणी आहे.

**हेमंतः**—मग काय, तीं सर्वेच पत्रं बनावट कीं काय ? त्याच्याजवळ कमींत कमी १०० पत्र होतीं.

**श्रीरंगः**—म्हणजे, तुम्हीं त्याच्यावर विश्वास ठेवून आम्हीच खोटे असें म्हणतां ? अति विचार करण्याचं हें फळ आहे. अविचारी माणूस जितका वाईट असतो तितकाच अति विचारी माणूस वाईट बनतो. संशयाला समंजसपणानं जागा दिली कीं बुद्धिमत्तेचे डोळे फुटलेच म्हणून समजा.

**हेमंतः**—मग काय माझीच दिशाभूल झाली तर ?

**श्रीरंगः**—खात्रीनं, हें पहा माझ्या चित्रांगीच हस्ताक्षर ( पत्र दाखवतो ).

**हेमंतः**—( पत्र पाहून ) एकूण मी खराच पंचविशीचा गाढव ठरलों तर ! बाबासाहेब माफ करा, या तुमच्या विचित्र प्रदेशांत मी अगदीं नवखाच आहें म्हणून माझी अशी दिशाभूल झाली. त्या रंगेलला मी वेडा पण सभ्य गृहस्थ समजलों ! आणि तीं बनावट पत्र असतील हे ओळखण्याइतकी माझी दृष्टीहि साफ राहिली नाहीं. माझीचशी काय माझ्यापेक्षां बुद्धीनं अगर नजरेनें तीव्र

असणाऱ्याचीहि महाराष्ट्राच्या बाबतींत फसवणूक होईल अशी माझी या प्रसंगानं खात्री झाली आहे. बाबासाहेब, आपल्या उभयतांच्या बाबतींत घडलेली चूक अक्षम्य आहे. तुम्ही मला क्षमा कराल. पण माझ्या हृदयांतलं हें शल्य सारखं सलत राहील ! तुमच्या मुलीजवळ क्षमेची याचनाहि मी करूं इच्छीत नाहीं.

**श्रीरंगः**—हेमंत, आपल्या निष्पाप मनाची मला खात्री आहे. चित्रांगी पोरी " दे हाता या शरणागता " अग ए ऐकलंसना ( नंदिनी येते) पुढल्याच मुहूर्तावर तुझ्या चित्रेचं आणि माझ्या हेमंताचं लग्न होणार बरं !

**नंदिनीः**—इकडल्या तोंडांत साखर पडो. जोडा कसा लक्ष्मीनारायणा-सारखा शोभतो. अगदीं दृष्टच काढावी.

**चित्रांगीः**—बाबा ! झालं तें झालं. परंतु मला मात्र यांच्याशीं साफ लग्न लावायचं नाहीं. ज्या जागीं रत्नं वेचायचीं त्याच जागीं गोवऱ्या कोण वेचतं ! कमलाला हात घालतांना चिखल लागल्याबरोबर तो कायमचा धुवून काढावा लागतो. केवड्याची पात काढतांना हाताला काटेरी करवत झोंबल्याबरोबर मुळाशी असणाऱ्या नागाची छाया भासमान होते. समंजस सुशिक्षितांचा बस् झाला परिचय ! बुद्धीची बिरुदें वाळगणाऱ्या असल्या सुशिक्षितांच्या भावना म्हणजे सदाफुलीच्या वासहीन ताटव्याखालील तेरड्याची भडक फुलं !

**श्रीरंगः**—आपल्याला आतां यांतलं कांहींच कळत नाहीं बुवा ! अलीकडील सुशिक्षित स्वतःचीं लग्नं स्वतः लावतात. पहा कांहीं जमलं तर. चला राणी-साहेब. ( श्रीरंग नंदिनी जातात. )

**हेमंतः**—या प्रसंगापूर्वी केवळ पित्राज्ञेमुळं तुझ्याशीं लग्न करणार होतों, पण आतां माझी इच्छा द्विगुणित झाली आहे. करीन तर तुझ्याशींच लग्न करीन.

**चित्रांगीः**—नाहीं तर काय कराल ? जीव द्याल-द्या. तेच मला पहायचं आहे. माझी मी पूर्ण स्वतंत्र आहे.

**हेमंतः**—नाहीं कोण म्हणतो ? तुझ्या स्वातंत्र्यसिंहासनावर या हेमंताची स्वतंत्र स्थापना कर म्हणजे झालं.

**चित्रांगीः**—बस, लग्न करीन तर एका अशिक्षित, खेडवळ, पण अव्याज अशा तरुणाशींच लग्न करीन. शिक्षणानें अतिविचारी बनलेल्या अशा सुशि-क्षितांना निवळ एकरशी, कुरूप व फत्तर डोक्याच्या बायका मिळाल्या पाहिजेत. तेव्हांच मूर्ख भावनांच्या भांगेची धुंदी उतरेल. बस, हाच माझा निश्चय—

**हेमंतः**—चित्रांगी—

**चित्रांगीः**-खबरदार मला एकेरी नावानं हाक माराल तर !

**हेमंतः**—चित्रे, मीहि तुला दृढनिश्चयानें सांगतों कीं, करीन तर तुझ्याशींच लग्न करीन ! पाहूं या ! आजचं युग तुमचं स्त्रियांचंच आहे कीं पूर्ववत् पुरुषांचच आहे, याचा निकाल आपल्या लग्नानंच होणार आहे. पौरुषी कर्तेबगारीला आजच कांहीं स्त्रीचा बुरखा मिळाला नाहीं.

**चित्रांगीः**—अशा प्रतिज्ञेवर उगाच आपल्या जिवाचं मातेरं नका करून घेऊं ? आतां एखादी-सादिलवार पोरगी पहा आणि करा लग्नमंडप साजरा बरं ! ( जाते )

**हेमंतः**—चित्रे,चित्रे,चित्रांगी—अरे गेलीच ही!(स्व )बस् करीन तर चित्रांगीशींच लग्न करीन ! माझ्या वेडगळपणामुळं चित्रांगीचं खरं चित्र मला दिसून आलं इच्या जिभेंत तरवारीची धार एकवटली आहे, पण हृदय पुनवेच्या पवित्र चंद्रिकेइतकच कोमल व सफेद असलं पाहिजे. माझा अजिबात ग्रह चुकला ! चित्रे, तुझं हृदय समजून घेण्यांत प्रेमाचा पहिलाच पाठ मी शिकत आहे. ह्या खऱ्या प्रेमाचा पाठ शिकल्यावर जगाकडे नजर वळवताच जिकडे तिकडे प्रेमाचीं माणिकमोतीं मला दिसूं लागलीं. आयुष्याची बरोबर कल्पना आज मला पहिल्यानं झाली. या जगांत कांहीं क्षण असे येत असतात कीं देवांनाहि मानव होऊन भूलोकावर अवतरण्याचा मोह अनावर होतो. मना अनावर होऊं नको ! तुला अजून बराच मार्ग आक्रमायचा आहे. परिस्तानच्या मुशाफरीवर आतां कुठं तूं निघणार आहेस. प्रेम, प्रणय, रति, आणि भक्ती या चार पाकळ्यांच्या हळूवार तुरूंगांतील मधुपराग अजून तुझ्या हातीं लागलेला नाहीं.

**शिशीरः**—( प्र. करून स्वगत ) हा ही एक माझ्यासारखाच भग्न मनोरथी आहे. समदुःखी जनाचा सहवास एकमेकांना शांतिप्रद होतो. ( उघड ) तुम्हालाही अखेर नाहींच यश आलना ?

**हेमंतः**—असे निराश होऊं नका. ही निराशा पार झाडून टाका आणि कर्तव्याच्या मार्गावर मुशाफरीच्या तयारीनं उभे रहा. चला मी तुम्हाला कल्याणी मिळवण्याचा गुरूमंत्र देतो. अहो आपण महाराष्ट्रीय आहों. वाटेल ती मुत्सद्देगिरी करूं पण यांच्याशींच लग्न करून वरनाकानें फिरूं. ( जातात )

---

## प्रवेश दुसरा

( स्थळ–रस्ता. जोडा व फेटा खाकोटीस मारून धांवत असलेला बिहारी येतो. )

**बिहारीः**—( स्व. ) सुटलों ! सुटलों एकदाचा त्या दांडगेश्वराच्या तावडींतून ! बरं तरि बरं, नाहीं तर या वेश्येच्या नादानें आज रामच म्हणायची पाळी आली होती. छे ! छे ! छे, या गळ्या कुच्या हिंडण्यांनं केव्हां काय गंडांतर येईल कांहीं सांगवत नाहीं ! अगदीं जोडा मुंडासे खाकोटीस मारून धूम धांवत सुटलों म्हणून सुटलों. नाहींतर त्या रंगीनायकीणीच्या रंगमहालांतच आमचा आज मुडदा पाडला जाऊन पोलीसनां उद्यां पंचनामा करण्याची पाळी आली असती. तरी पळतां पळतां तिच्या त्या नव्या लठ्यानं घातलाच एक धोपटा डोक्यांत–हाहाहा ! जबर तडाखा मारलान गुलामानं–डोकं कसं सुन् झालंय, अजून काजवे चमकताहेत डोळ्यांपुढं. बिहारी हा नाद सोड सोड म्हणून सारं जग सांगत होतें. तेव्हां आमच्या डोक्यांत प्रकाश पडला नाहीं. पण आज जेव्हां खरोखरच डोकं फुटलं तेव्हां कुठें डोक्यानं या नादाचा तिटकारा घेतल्यासारखं झालं आहे ! नीच ! नीच–वेश्येची जात ! आमचे खिसे छन् छन् वाजेतोंपर्यंतच या छेलछबेल्यांची आमच्यावर मेहेरनजर. पण तोच खिसा खुळखुळेनासा झाला कीं यांनीं नवा गुलछबू गाठलाच म्हणून समजावं. हाहाहा ! एकसारखा ठणका लागला आहे. आजन्म वेश्येची माडी म्हणून चढायची नाहीं. आधीं जाते बुद्धि मग जातें भांडवल, तसं या व्यसनांनीं माझं झालं आहे. ( पाहून ) अरे काय पहातों मी. वृन्दा आणि रंगेल इकडेच येताहेत. बुद्धि आणि भांडवलहि जशी मला सोडून गेली, तशी बायकोहि रंगेलचा हात धरून चालली काय ? इथच किंचित वेळ दबा धरून पाहिलं पाहिजे. ( दबा धरून बसतो. वृन्दा व रंगेल येतात. )

**वृंदाः**—ते कोणत्या रस्त्यानं गेले ? तुम्ही आणि मी दोघा मिळून केव्हां त्यांच्या दृष्टीस पडूं असं झालंय ?

**रंगेलः**—आपण त्याच्या मागोमागच नाहीं का आलों ?

**वृंदाः**—पण एकाएकीं असे नाहींसे कसे झाले ? चला ते असतील तिथून त्यांनां शोधून काढूं.

**रंगेलः**—वृन्दा मी तुझा Lover मग माझ्याशीं अशा तुसडेपणानें कां वागतेस ? वेश्यांच्या नादानं नंदिबैल बनलेला बिहारी–त्याला काळीज आहे कुठें ?

**वृंदा:**—तें मी उत्पन्न करीन–तुमच्या सहवासानं तें आपोआप उत्पन्न होईल. चला पाहूं आधीं त्यांना शोधून काढूं !

**रंगेल:**—पाय घसरलेल्यांना कुठें शोधून काढायचे ? काय वेश्यांची घरं धुंडाळायची ?

**वृंदा:**—तेंहि मी करीन. तुह्मीं नुसते बरोबर चला. चला ना—

**रंगेल:**—अशी मुरका मारू नकोस. ओठ्हरकोटाला चळ भरतो. बिहारी-समोर मला प्रेमानें पालवतेस, नखऱ्यांनीं डुलवतेस आणि त्याच्या पश्चात् माझा एक शब्दहि ऐकून घेत नाहींस याचा अर्थ काय ? विरहानें मी अगदीं वेडा झालों आहे.

**वृंदा:**—माझी मैत्री तुम्हाला दिली आहे ना ? मग आणखी काय पाहिजे !

**रंगेल:**—मैत्री ? हा एक शब्द झाला. या शब्दाचें प्रेम आपल्याला बिलकुल येत नाहीं बुवा.

**वृंदा:**—तेंच तर खरं सात्विक प्रेम. माझ्यावर तुमचं सात्विक प्रेम आहे ना ?

**रंगेल:**—हो. हें काय विचारतेस ?

**वृंदा:**—मग ? सात्विक प्रेमावाचून या जगांत दुसरें काहींच नाहीं.

**रंगेल:**—असेल तसं, पण यांत कांहीं तरी चुकताहे असं वाटतं. जे चुकताहे त्याची सुधारणा करशील तर तें सात्विक प्रेम नसलं तरी आपल्याला चालेल ! लांबच कशाला ? असं बघ वृंदे, इथ आपण दोघंच आहों. किती खुबीदार वेळ ही ! अगदीं झकास संधी आहे.

**वृंदा:**—ह्मणजे काय ? आपण इथून चटकन् निघून जायचं ?

**रंगेल:**—( स्वगत ) किती अरसिक ? कल्पनेचा अर्थ कृतींत उतरायचा सोडून—) वृंदे जिकडे तिकडे काळोख ! अशा वेळीं ओठांची चकमक घासून प्रकाश पाड. चुकत होतं तें हेंच.

**वृंदा:**—रंगेलराव एकदा बोललांत ते बोललांत परत बोलूं नका.

**रंगेल:**—बरं बुवा. बोलत नाहीं एकदम कार्यालाच आरंभ करूं. वृंदे एकच चोरटा.

**वृंदा:**—चोरटा ? सैताना संसाराच्या काळजीनें निमीलित असणाऱ्यांना असलीं चोरटीं पापेंच ठाऊक नसतात.

**रंगेलः**—संसाराची काळजी ? आणि तुला ? प्रत्यक्ष नवऱ्याच्या तोंडा-समोर मला पालवणारी तूं ? तुझ्यासारख्या ह्मणजेच पतिव्रता हें आज मला दिसून आलं ( हसतो )

**वृंदाः**—तें कांहीं असो ! तुमच्या नीच मनोवृत्तीच्या सहवासांत रहाण्या-पेक्षा ही मी चालले.

**रंगेलः**—( तिचा पदर धरून ) जातेस कुठं ? नवऱ्याचा शोध करायला ! काय पण पतिव्रता ! मी तुझा Lover ह्मणतेस आणि स्वतःला पतिव्रता ह्मण-वून घेतेस ?

**वृंदाः**—नादान माणसा, माणुसकी समजून घ्यायची तुला अक्कल तरी कुठ आहे ? चित्रांगीन माझ्या पतीचं वाकड पाऊल सुधारण्यासाठीं सुचवलेला उपाय ह्मणून माझ्या पतीसमोर तुझ्यावर मी शब्दाचें प्रेम दाखवीत आले. पण त्यांच्या नकळत या क्षणाशिवाय मी तुझ्याशी एक शब्दहि बोलले आहे काय ?

**रंगेलः**—नायकिणीच्या पोरीला हे पतिव्रतांचे ढंग हवेत कशाला ?

**वृंदाः**—मूर्खा, मी माझ्या पतीचें प्रेम आपल्यावर ओढून घेण्याकरतां ह्मणून खोटाच, लग्नापूर्वीपासून नायकिणीची पोर असल्याचा, बहाणा केला होता. चित्रांगी माझी बाळपणाची मैत्रीण व वर्गभगिनी आहे. तिच्या या चुलत्याचे वाकडे पाऊल स्थीर व्हावे ह्मणून या अनाथ मुलीनें त्यांच्या नायकिणीच्या शोकाखातर हा लपंडाव केला ! समजलं ?

**बिहारीः**—( स्व. ) पूर्वकालच्या सर्व प्रसंगाचा मेळ आतां झटदिशीं बसला. अहाहा वृंदे तूं इतका स्वार्थत्याग नालायक माणसाकरता उगाच केलास.

**वृंदाः**—तुझ्यावर शब्दाचं प्रेम म्हणजेच या पतिव्रतेनं पांघरलेला तो बुरखा होता ! माझे पती मला ताळ्यावर आणायचे आहेत, पण तेवढंहि कृत्य मला साधूं दिलं नाहींस. आतां बऱ्या बोलानं शुद्धीवर येतोस कीं—

**रंगेलः**—वृंदे–हें सर्व खरं असलं तरी यावेळीं मी तुझ्या सौंदर्याचा आस्वाद घेतल्यावाचून रहाणार नाहीं. ( तिचा हात धरतो. )

**वृंदाः**—( चाकू काढून रंगेलच्या हातावर वार करते. )

**रंगेलः**—किती धाडशी बाई ही, नेम चुकला ह्मणून निभावलें ! कोण जवळ असणार आसपास मरायला यावेळीं !

**बिहारीः**—( पुढें येतो ) मरायला नाहीं–पण तुला मारायला हा तिचा पती बिहारी आला. पहा. पाजी मनुष्या—

**रंगेलः**—( अरे बापरे हा तर तिचा नवरा. )

**बिहारीः**—वृंदे, वृंदे, माझं परावर्तन झालं आहे. नव्हे तुझ्या निव्वळ पातिव्रत्यामुळं घडून आलं ! तुझ्या चरित्राचं खरं स्वरूप आज मला समजलं !

**वृंदाः**—अगबाई पण हें रक्त कसलं ?

**बिहारीः**—वृंदे, तें मला सांगवत नाहीं. तूंच माझा उद्धार केलास.

**वृंदाः**—देवा, यांना खरा पश्चात्ताप झालेला दिसतों. अखेर मी जिंकली. नाथ—( तो तिला जवळ घेतो. )

**रंगेलः**—जगांत मुळीं प्रेमच नाहीं. सारा स्वार्थ ! टांकसाळींत काम करणाऱ्या भिकाऱ्यासारखी माझी स्थिती झाली आहे. जिकडे पहावें तिकडे सुंदर पोरी, पण माझ्या वाटणीस एकहि येणार असेल तर शपथ.

**कंगालः**—( प्रवेश करतो ) ( स्व. ) कोण बोलतंय इकडे ? सहज बाहेर पडलों तों रस्त्यांत आपली गडबड ! हा रंगेल वाटते ! हा रांडेच्या ! दुसरी कोण ती ? हा एकटा असा कधीं नसायचा ! निदान रस्त्यानं जाणाऱ्या स्त्रीच्या जवळून तरी चालत असायचाच. कोण, रंगेल ! हां. हां, हां, हा !

**वृंदाः**—रंगेल, हेमंतचित्रांगीच्या लग्नांत असाच पाजीपणा केलांत !

**कंगालः**—माझ्या लग्नाच्या बाबतींत तसाच हलकटपणा केलांत !

**वृंदाः**—या तुमच्या प्रेमाला ह्मणावं तरी काय ?

**बिहारीः**—आधुनिक चवचालींना बळी गेलेला माणूस आहे दुसरं काय ?

**वृंदाः**—हे पहा ! केलेले गुन्हे कायद्याच्या कलमानें निस्तरावे लागतात. तुला पोलीसच्याच स्वाधीन आतां करायला पाहिजे.

**कंगालः**—हो, हो, तसंच करायला पाहिजे. ध्या माझी साक्ष, मी स्वतः पाहलय ! ( स्वगत ) सूड उगवायला बरी संधी आहे. माणूस जन्मःतच साक्षीदार असतो ! आणि त्यांत खोटी साक्ष देण्याची तयारी ह्मणजे तर ईश्वराची देणगी ( उघड ) चला श्रीरंगाच्याकडे. बार भरून देऊं उडवून येरवड्याच्या तुरुंगांत ! रंगेल मला तुरुंगाची धास्ती घालित होतास नाहीं ? अरे बाबा माझा ह्मणजे सापाचा बारा वर्षांचा डूक. कांहीं तरी निदान खोटी साक्ष देऊन तरी सूड उगवून घेईल !

**रंगेलः**—अरेरे, प्रेम प्रेम म्हणून सुंदर मुलींच्या भोंवतीं लाळ घोटून तरुणींची प्राप्ती करून घेऊं पाहण्याचा स्वैराचार पाढणाऱ्या–आणि प्रेम-सौंदर्यावरच छोट्या छोट्या कविता करून मला प्रेम करायला शिकवणाऱ्या साऱ्या कवि कळपातून आज मला सोडवायला एकाचाहि उपयोग होऊं नये? प्रेमकवितांनीं शिकवलेल्या प्रेमाच्या तऱ्हा अमलांत आणूं पहाणारे माझ्या-सारखे रसिक आजपर्यंत किती तरी तुरुंगांत गेले असतील. कित्येकांच्या मोठाल्या नोकऱ्या गेल्या असतील. युवतीजनांच्या बाबतींत ठरणाऱ्या गुन्हे-गारांची तपासणी करून निकाल सांगण्याच्या कामीं एकाद्या प्रख्यात प्रेम-प्रोफेसरांची Special Judge म्हणून नेमणूक झाली पाहिजे तरच आमचा निभाव कांहीं लागेल! अरेरे! गांवोगांव निघालेल्या कविशाळातून प्रेमाचे धडे शिकतां शिकतां गुन्हेगारीपर्यंत मजल जाऊन पोचावी ना? बस् या उपर आधुनिक प्रेमकविता वाचीन तर हराम, आणि अलीकडील कांहीं तरुणांप्रमाणें प्रेम प्रेम म्हणून पोरीभोंवतीं लाळ घोटीन तर शपथ. ( जातो )

**कंगालः**—बिहारी–चला लौकर! नाहीं तर हा बेटा एखाद्या हाटेलांत जाऊन लपेल.

**बिहारीः**—वृंदे, चल आपण बाबासाहेबांच्या पायां पडूं. ( जातात )

---

## प्रवेश तिसरा

( **स्थळः**–बगीचा–एक दगडी बाक. **पात्रेंः**–चित्रांगी व कल्याणी बोलत बसल्या आहेत. )

**चित्रांगीः**—मावशी चलनाग घरांत! माझ्याच्यानं या बागेंत मुळींच बसवत नाहीं. हीं सारीं फुलं गोळा करावीं अन् पाकळीन् पाकळी कुस्करून टाकावींशीं वाटतात!

**कल्याणीः**—हा सारा आत्मसंताप. हेमंतरावांचा गैरसमज झाला तो त्यांनीं मनोभावानं व्यक्त केला. एवढं सारं झाल्यावरहि तूं त्यांना वाग्ताडण करून घालवून दिलंस! आताग कां संताप करतेस?

**चित्रांगीः**—डिवंच आणखी डिवच! या दोनचार दिवसांत उभ्या आयु-ष्याला आटवून टाकण्याइतका त्रास झाला आहे. भूतकालाकडे माणसाची पाठ

असते ह्मणून बरं, नाहीं तर पूर्वकालीन सुखाच्या मोहक सागरांत भविष्याकडील थांव पार मावळली असती.

**कंगालः**—चित्राताई, मनुष्याच्या मनोभूमीवर स्थायीभूत झालेला एकच रस असावा आणि तो ह्मणजे शांतरस. शांततेच्या रसरंगरांत ध्यानस्थ असणाऱ्या जिवाला विकारांचा वारा स्पर्शहि करूं शकत नाहीं. झालं तें झालं. कालगंगेला मिळालं. विस्मरणीच्या पचनीं पडलं. आतां संताप करून कां घेतेस?

**चित्रांगीः**—मावशी तुझा गंभीर वाग्प्रवाह सुरू झाला कीं तुझ्या गळयाला जीव जाईपर्यंत कडकडून मिठी मारावीशी वाटते. मावशी माझं मीपण मला फिरून मिळेल काय? या चार दिवसांच्या चारित्र्यांत माझेंपण पार लयाला गेलं असं वाटतं.

**कल्याणीः**—संताप सोडून समतोल वृत्तीनं नजर उघड ह्मणजे तुझंपण तुला सांपडेल. तुझा आनंद, बागडती वृत्ती व सदासुखी हालचाल ह्मणजेच चित्रांगी, मग जोगी रागाचे असले करुण स्वर आळवीत जगाला वळसा का घालतेस?

**चित्रांगीः**—मावशी कुठं तरी चुकल्या चुकल्यासारख वाटतं.

**कल्याणीः**—चित्राताई, निराशावादाचें असे हे तामसी उद्गार घोळीत बसणार असशील तर माझ्याजवळ एक क्षणभरहि बसूं नकोस. निराशावादानं निष्प्राण झालेले तुझे शिशीर काका गेले, पण तुझ्या रूपानें आपल्या निराशेला एक नवीन वारस तयार करून ठेवला.

**चित्रांगीः**—अस्से! मनांतल्या मनांत शिशीरकाकांच्या आठवणी चालल्या आहेत वाटतं? गरीब बिचारे शिशीरकाका! मावशी, तू किनई, निव्वळ कसाईण आहेस. त्यांच्या आशेला पुरेसं आकाश असतांनाहि त्यांची प्रेमभरारी पंखहीन करून टाकलीस!

**कल्याणीः**—आणि तूं नाहीं कां हेमंतरावांची तीच अवस्था केलीस? त्याच समतोल दृष्टीनं हेमंतरावाकडे पहा! जरा डोळे उघड. चित्रे. क्षणाचेच खेळ असतात पण ते भरल्या जन्मानं पश्चात्ताप करून निस्तारावे लागतात.

**चित्रांगीः**—त्यांचं नांव काढलंस कीं जिवाचा कसा दाह होतो. इच्छा नसतांनासुद्धां सारखे माझ्यासमोर ते दिसूं लागतात. कुठून आले आणि नवरदेव झाले! मी करूं तरी काय?

**कल्याणीः**—चित्रे, सांगूच ? हेमंतरावावर तुझं प्रेम स्थीर झालं आहे. पण केवळ तुझ्या मानी स्वभावामुळं त्यावर विश्वास ठेवण्याचा तुला राग येतो ! असंच ना ? असंच ना ? या दोन भावनांची रणधुमाळी म्हणजेच तुझी ही तामसी वृत्ती ! सांग ! माझ्या ह्या पृथक्करणाला किती मार्क देशील ?

**चित्रांगीः**—थांब, मी बाबांना जाऊन सांगते. कां ग अशी छळतेस ? तुझ्या हातांत मी म्हणजे बाहुली सांपडलें आहे कीं काय ? तूं एकदा लग्न होऊन केव्हां जाशीलसं झालं आहे ! असल्या गुणांनीं परत माहेर तरी दिसेल का ? हां ह्मण ! या माझ्या कांगाव्याचें कारणसुद्धां हेमंतरावच ह्मणून ? तुझ्या मनांत मात्र शिशीरकाकावरचं प्रेम ठाणं देऊन बसलं आहे दुसरं काय ?

**कल्याणीः**—माझ्या मनाचे ठाणेदार तूर्त तरी माझें ध्येय आहे, समजलीस ! शिशीरविषयीं कांहीं वाटत असलं तरी ध्येयप्राप्तीपर्यंत हृदयांत मी प्रेमाला सारखा मज्जाव करीत रहाणार !

**चित्रांगीः**—आलं माझ्या लक्षांत. खरंच सांग बरं मावशी, तुझ्याबद्दल शिशीरांना व माझ्याबद्दल हेमंतरावांना काय वाटत असेल ग ?

**कल्याणीः**—पुरुष म्हणजे एका कानानं ऐकतात व दुसऱ्या कानानं सोडून देतात ! हेमंतरावांना तुझ्याबद्दल कांहींच वाटत नसेल ! बायकांचें मात्र तसं नाहीं. त्या दोन्हीं कानांनीं ऐकतात व तोंडानं सोडून देतात. आतां सांग तर तुझं त्यांच्यावर मन बसलं आहे ह्मणून ?

**चित्रांगीः**—अग वागवा ! पडुं पडु आणि काळीज काढू ! तुला आतां मनं बसवावीशीं वाटतात. यापुढं तुझ्याशीं एक अक्षरहि बोलणार नाहीं. अश्शी रुसेन ( तशी बसते ).

**कल्याणीः**—अग्-गई, राग आला वाटतं रुसुबाई रुसू आणि कोपऱ्यांत बसू. बसेनास ! मी तुझे हेमंतराव आहे थोडीच ! लाडके, जिवलगे ह्मणून मनधरणी करायला ! ( श्रीरंगराव हातात एक वर्तमानपत्र घेऊन खिन्न मनानं येऊन बसतात. )

**कल्याणीः**—बाबासाहेब, बाबासाहेब, बोलत का नाहीं ? चित्रेमुळं आपल्याला खेद होतो का ? आपण आजारी का आहां ? असें खिन्न आणि दुःखी का ? तुमच्या आवडत्या शोपेनहार मधील कांहीं निबंध वाचून दाखवूं का ? आणूं का पुस्तक ?

**श्रीरंगः**—काय सांगूं कपाळ. तूंच हें वाच.

**कल्याणीः**—( वाचते. ) आत्म-ह-त्या !

**चित्रांगीः**—बाबा, असं झालं आहे तरी काय ? तुमच्या या खिन्नतेची आम्हांला भिती वाटते.

**श्रीरंगः**—( सुस्कार सोडतो ) या वर्तमानपत्रांत माझ्या हेमंतच्या आत्महत्येचं गोपन प्रसिद्ध झालं आहे ( दोघी स्तंभित होतात ) कालरोजीं माझ्या हेमंतनं आत्महत्त्या केल्याचं, त्याच्या एका नातेवाइकाच्या, उदासच्या, खदस्तुरानं प्रसिद्ध झाल आहे. या दोनचार दिवसांतील प्रकारांनीं हेमंतच्या मनावर जबर आघात झाला ! नाजूक मनाला होणारे निराशेचे आघात हे फुलावर पडणाऱ्या विजेइतकेच वज्रप्राय असतात. माझ्या प्रकृतीला दुःख करणं अपवित्र वाटतं म्हणून ! नाहीं तर हेमंतकरितां रडून रडून दगडाला पाझर फोडले असते.

**कल्याणीः**—( स्वगत ) प्रेमनिराशेनं माणसाचं मन इतकं दुखावलं जातं का ? माझ्यामुळं चिंधीरांचीहि प्रेमनिराशा ! हर्ष खेदाचे मानवीपाश ( उ. ) तुटल्यानें अगतिक झालेले लोक कसाब मनोवृत्तीचे बनतात असं या प्रसंगीच्या अनुभवानंतर मला वाटू लागलं आहे.

**श्रीरंगः**—हेमंतानं जगापासून आपणाला सोडवून घेतलं त्याबद्दल आमच्या अज्ञानामुळं आम्हांस खेद झाला. वास्तविक त्याबद्दल आनंदोत्सव करण्याची चाल रूढ केली पाहिजे. त्यांतून चित्रेला तर विशेष आनंदच वाटला पाहिजे. ( स्वगत. ) या प्रसंगाची तीव्रता अशाच उण्या उद्गारांनीं बोथट केली पाहिजे. नाहीं तर या पोरी अगदीं घाबरून जातील. ( उघड ) आत्महत्या करणं म्हणजे वेडेपणा नव्हे का ? मूर्ख माणूस ! चित्रा, अशल्या वेडेचाराचा खेद का करावा ? तें कांहीं नाहीं. चला आपण आपापल्या उद्योगाला लागूं ! जगांत असे अनेक आत्मघात होताहेत नुसत्या नादानंच जगांत किती आत्महत्या घडत आहेत ? आमच्या या महाराष्ट्रांत छानछोकी व प्रेम याच्या किडी लागून किती तरी तरुण अंतःकरणं पोखरलीं जात आहेत! ते कांहीं नाहीं! स्वतः आत्मघात करणाऱ्याला सहानुभूती कधींहि मिळत नसते. चित्रे, चल आपण घरीं जाऊं.

**चित्रांगीः**—( दुःखानं स्वगत ) काय झालं हें. मौनव्रत हीच दुःखाची भाषा !

**कल्याणीः**—चित्रे, कीं आपण कुठं तरी बाहेर जायचं ?

**श्रीरंगः**—मी तिच्याकरितां एक छान छान पुस्तक आणलं आहे. चित्रांगी चल घरांत. तें मी तुला स्वतः वाचून दाखविणार आहे. ( श्रीरंग चित्रांगीला हातीं धरून नेतात. )

**कल्याणीः**—किती विचित्र प्रकार घडून येत आहेत चित्रांगीच्या हृदयांत पतिभावनेचा रुजवा होतो न होतो तोंच हेमंतांना आत्महत्त्या करावीशी वाटावं ? पोटांत भूक उत्पन्न व्हावी तोंच काळपुरुषानं समोरचं ताट उचलून न्यावं ! तहानेनं सोख पडल्या ओठासमोर भरलेला पेला धरावा, तोंच अकस्मात् रिता व्हावा आणि जलांत बुडत असणाऱ्याच्या तोंडांत मात्र आपोआप पाणी शिरावं ! दैवाच्या दुरंगी ग्रंथीनं जगाला किती भेसूर विसंगति आणली आहे. शिशीराच्या बाबतींतील तीच विसंगति माझ्यांतहि उतरावीना ? आजच्या माझ्या वागणुकीची जी जाणीव झाली आहे तशी यापूर्वी कधीच झाली नव्हती.

( जानू येतो. )

**जानूः**—तायबाय ! तात्यानीं हयतां कागोद दिला हाय तुमास्नी.

**कल्याणीः**—( पाकीट घेऊन कव्हरावरील वाचते ) Insured for Rupees Ten Thousands ( पत्र उघडून वाचते. ) हें शिशीरचं पत्र ! " तूं आर्थिक स्वावलंबनाचं ध्येय जवळ करून मला दूर करीत आलीस त्यामुळं माझं अखिल जीवन शून्यवत् झालं आहे. आत्महत्त्या करण्यापेक्षां निसर्गतः येणाऱ्या मरणापर्यंत ( तें लवकरच येवो ) अविवाहित स्थितींत काळ काढण्याचं मी निश्चित केलं आहे. माझेजवळ असलेल्या १०००० रुपयांची आतां मला गरज नसल्यामुळं ते तुझ्याकडे तुझं आयुष्य तुझ्या ध्येयाप्रमाणें सुखांत जावं म्हणून पाठवून देत आहे. "

" मृतवत् शिशीर "

काय होत आहे हें ! हेमंतरावांची ती स्थिती आणि यांची ही स्थिती आणि याचं कारण चित्रांगी आणि मी !

**जानूः**—काय कारभाऱ्यांचं पतर हाय काय ? कधीं यायचं म्हंनतात ?

**कल्याणीः**—जानबा, मला कारभारीबिरभारी कोणी नाहीं. माझं लग्न अजून व्हावयाचं आहे.

**जानू**—अजून शान लगन नाय झालं ( स्व. ) दिसत्ये तर बिजाईत बाय-वानी ( उघड ) अरं रांडच्यानु, व्हरव्ह. मी यकदम इसारलोंना ! ! मंग आतां म्होरं काय ? हत बसूका झाशी काय झोरलं बोलतांव ? काय निरोप घेतांव काय ?

**कल्याणीः**—कांहीं नाहीं जा घरांत.

**जानूः**—तायबाय पर बोलूत्र काय ? मग योक फाटकिशी वायटावानी चोली याल काय ? चोली याल काय ? मी कोंकणांत जाया निघालांय. (कल्याणी हंसते ) घरांत कारभारीण हाय माजी.

**कल्याणीः**—देईन बरं, जा आतां. ( जानू जातो ) अशा अशिक्षितांनीं प्रेमाची जोपासना करावी आणि आह्मी सुशिक्षितांनीं—सांसारिक प्रेम हेंच बायकांच्या आयुष्याचं सार ! ( शिशीर येतो. )

**शिशीरः**—बाबासाहेब कुठं आहेत ? मला तिकडे कळलं कीं बाबासाहेब बागेंत आहेत म्हणून. इथें नाहींत तर? बरं जातो तिकडेच.

**कल्याणीः**—आपलं काय काम आहे !

**शिशीरः**—नसत्या गोष्टी स्त्रियांजवळ सांगत बसण्याची माझी इच्छा नाहीं.

**कल्याणीः**—मग इथंच बसा. ते इतक्यांतच इथ येतील. नाहीं तर मी त्यांना बोलावून आणीन !

**शिशीरः**—पुरुष जोवर तुमची मनधरणी करीत असतो, तोवर त्याला लाथाडायचं व मग ते दुखावून दूर गेले कीं कांहीं तरी सबबी काढून लचकत लचकत बोलत उभं राहण्याची ही तुह्मां तरुणींची वाईट खोड !

**कल्याणीः**—अगबाई एकूण अजुनी आम्हां बायकांच्या लचकण्याकडे, मृत्यूला तयार झालेल्यांचं लक्ष आतं ह्मणायचं !

**शिशीरः**—ओटांतल्या ओठांत जीभ फिरविण्याचा आणि या बी. ए. पदराचा कांहीं उपयोग होणार नाहीं.

**कल्याणीः**—बी. ए. पदर ह्मणजे काय ? व त्याची तुह्माला इतकी चीड का ?

**शिशीरः**—आतां मला सर्व स्त्रीजातीची चीड आली आहे. ज्या पदराचं एक टोंक जमीनीपर्यंत भिडतं व दुसरं उजव्या हतीं रहातं तो बी. ए. पदर.

**कल्याणीः**—पण प्रेमळ सुंदर स्त्रियांना तो शोभा नाहीं का देत ?

**शिशीरः**—स्त्रिया आणि सुंदर ( सुस्कारा सोडतो ) हे दोन सकार एका ठिकाणीं आणण्यापूर्वी परमेश्वर आपली आत्महत्या करून घेईल. याच दोन सकारांनीं माझं जीवन शून्यवत् करून टाकलं. त्यांना प्रेमळ जात म्हणण्यापेक्षां डफ्फर जात म्हटलं तर भाषेतील एक दुरुपयोग नष्ट होईल. सिंहीणी कधीं प्रेमळ असतात ? स्त्रीच्या कटीला सिंहकटीची उपमा दिली जाते या एका गोष्टीनंच स्त्रियांची क्रूरता व सौंदर्याभाव सिद्ध होतो.

**कल्याणीः**—आणि पुरुषांना सिंहाची उपमा देतात तेव्हां सिंह गोगलगाय बनलेले असतात वाटतं. बरं हें असो, पण माझ्यासारख्या स्त्रिया सुंदर दिसतात आणि प्रेमळहि असतात असं आपल्याला वाटतं कीं नाहीं ?

**शिशीरः**—त्याचा मी विचारच केलेला नाहीं व करणारहि नाहीं.

**कल्याणीः**—आपलं लग्न व्हावयाचं आहे की नाहीं ?

**शिशीरः**—नाहीं, व जोपर्यंत माझे हे विचार रहाणार तोपर्यंत होईलसंहि दिसत नाहीं.

**कल्याणीः**—अगदीं बरोबर उत्तर दिलंत ! कारण तुमचे विचार केव्हां बदलतील याचा कांहींच नेम नाहीं. बरं आतां आपण होऊन तुमच्यावर कोणी प्रेम केल तर ? म्हणजे, मी नव्हे.

**शिशीर**—प्रेम ही चीज जगांत नसते, पुस्तकांत असते व लग्नाला हपापलेले त्यांच्या तोंडांत असते. ज्या भ्रमावर जगाचा डोलारा उभा आहे, त्याचंच नांव प्रेम. प्रेमाची एकच जात माझ्या अनुभवाची आहे आणि ती म्हणजे " वात्सल्य. "

**कल्याणीः**—मग तें प्रेम माझ्याजवळ नाहीं. अहो गृहिणी होऊन मुलं बाळं कटिखांद्यावर खेळूं लागल्याशिवाय वात्सल्य येत नसतं.

**शिशीरः**—या वात्सल्य शब्दाची अशी मिमांसा करूं नकोस, व मीहि गृहिणीपदाची अपेक्षा करीत नाहीं. मेलों तरी कोणाहि स्त्रीकडे स्त्री या भावनेन पाहण्याची जाणीव मला उत्पन्न होणार नाहीं. मी अजून जिवंत आहे. त्यामुळं स्त्रीचे सद्गुण पहाण्याची माझी इच्छाच नाहीं. हे परस्त्रिये, मी परका माणूस. जा बाबासाहेबांना बोलाव बरं !

**कल्याणीः**—हे परपुरुषा, मी आपलं नांव त्यांना काय सांगावं बरं ?

**शिशीरः**—हे कुमारिके, जें नांव घेण्यानं तूं लज्जित होणार नाहींस असं नांव घे.

**कल्याणीः**—हे कुमारा, मी त्यांच्यापुढं विष्णुसहस्रनाम म्हणतें म्हणजे तेच त्यांतलं चांगलंस नांव घेतील.

**शिशीरः**—या तुझ्या विलक्षण उत्तराचा अर्थच मला समजत नाहीं.

**कल्याणीः**—आणि मला तरी तुमच्या या विचित्र भाषणपद्धतीचा अर्थ कुठं कळला आहे?

**शिशीरः**—माझ्या या विचित्र भाषणपद्धतीचा अर्थ हाच कीं, इतके दिवस तुम्ही मनधरणी करून थकल्यानंतर अविवाहीतपणें मरणाची अपेक्षा करीत कसं तरी जगायचं आणि कांहीं तरी बरळायचं.

**कल्याणीः**—मग माझ्याही विलक्षण उत्तराचा अर्थ हाच कीं, चित्रांगीच्या हेमंतानं प्रेमनिराशेमुळं आत्महत्त्या केली, तसंच तुमचं आयुष्य माझ्यामुळं फुकट जाऊं नये म्हणून कांहीं तरी विलक्षण बरळत राहून तुमच्या निराश मनाला फिरून प्रेममार्गावर आणायचं.

**शिशीरः**—कल्याणी तूं वेडी तर झाली नाहींस? असं माझ्यावर प्रेम करूं लागशील तर तुझ्या ध्येयाचं काय होईल?

**कल्याणीः**—तुमच्याकडून दहा हजार रुपयांचं Insuarance मिळालं आहे तेव्हां आतां त्या ध्येयाची मुळीं गरज उरली नाहीं असं आपल्याला नाहीं का वाटत?

**शिशीरः**—मग आतां माझ्याशीं लग्न करायला तयार आहेस तर तूं! मला कांहीं गरज नाहीं पण आपलं विचारतों. लग्न करायला तयार आहेस तूं?

**कल्याणीः**—हें काय विचारणं-मला नाहीं बाई कांहीं समजत!

**शिशीरः**—अहाहा! कल्याणी आज या शिशीरला तूं कृतकृत्य केलंस. माझी तपश्चर्या सफळ झाली. त्यामुळें—

**कल्याणीः**—हं! इतक्यांत नका! इतक्यांत नका असे हुरळून जाऊं. तुम्ही दहा हजार रुपये पाठविलेत म्हणून नव्हे, पण पहिल्यापासूनच तुमच्याविषयीं मला कांहीं वाटतं म्हणून मी इतकंच कबूल करते कीं माझा शिक्षणक्रम पुरा झाल्यावर करीन तर शिशीरांशींच लग्न करीन म्हणजे मलाहि ध्येयप्राप्ती होईल आणि शिशीरांनाहीं कल्याणी मिळाल्यासारखं होईल.

**शिशीरः**—Good Luck! अखेर हेमंतांचा गुरुमंत्र लागू पडला. Three cheers for Shishir. Hip, Hip Hurrah!

**कल्याणीः**—हेमंत ?

**शिशीरः**—( घाबरत ) होय हेमंतांनींच आत्महत्येपूर्वी हा गुरुमंत्र सांगितला. आणि या रत्नाची मला अशा रीतीनं प्राप्ती करून दिली. चल आतां आधीं बाबासाहेबांकडे जाऊं या.

---

## प्रवेश चवथा.

( स्थळः—चित्रांगीची खोली. दोनतीन खुर्च्या, टेबल वगैरे. )

पात्रेंः—चित्रांगी शोकाकुल मुद्रेनं विचार करीत बसली आहे. )

**चित्रांगीः**—( स्व. ) काय मी केलं आणि काय हें झालं! करीन तर एका अशिक्षित अव्याज तरुणाशींच लग्न करीन या मी आवेशाच्या भरांत केलेल्या प्रतिज्ञेमुळं निराश होऊन हेमंतरावांनीं आत्मघात करून घेतला याला मी जबाबदार आहे. माझ्याच नकारामुळं त्यांनीं आत्महत्या केली ना ? होय. त्या खुनाला कारण माझाच अविचार. आज पावेतों जें जें मी शिकल्यें, जें जें जगानं मला शिकवलं तें सर्व विसरून जाईन तर किती चांगल होईल ? प्रेम गर्विता, अहमन्य आणि मार्दवहीन बनलेल्या अशा माझ्यासारख्या स्त्रीकरितां— हेमंत, हेमंत तुमच्या मरणानं आज माझ्या काळजाला कवटून करुणरसाचा सागर हेलावून टाकला आहे. ( हेमंताचा फोटो घेऊन पहात बसते ) हें चित्र पाहूं का नको ? हाताच्या कराल मायेनं हें चित्र तडकून तर नाहीं ना जाणार? टपकणाऱ्या उन्हान् अश्रूंनीं वितळून तर नाहींना जाणार ? माझ्या मनस्थितीची क्रांति करण्याकरितां हें चित्र असंच राखून ठेवतें. ( पलगावर जाऊन पडते. हेमंत पांढरा रुमाल बांधलेला, साधा कोट, थिटें धोतर, हातांत पाकीट असा येतो व ती निजली आहे असं पाहून जमिनीवर मांडी घालून बसतो. चित्रांगी कांहीं वेळानं विचारांतून जागी होते. )

**हेमंतः**—( स्वगत ) एका चुलत्याशिवाय मला कोणीच नातेवाईक नाहींत, हें बाबासाहेबांना ठाऊक असल्यामुळं नाइलाज झाला. नाहीं तर या खेडवळ वेषांतरानं इतराप्रमाणं त्यांनाहि चकवलं असतं चित्रांगीला एका अव्याज खेडवळ तरुणाशीं लग्न लावायचं आहे नाहीं? पाहूं या आतां कुठल्या खेडवळाशीं लग्न लावते ती ?

**चित्रांगीः**—( स्वगत ) काय पहातें मी हें. हेमंतांनीं आत्महत्त्या केली ना ? ( उघड ) कोण तुह्मीं ? तुमचं नांव विचारूं का ?

**हेमंतः**—हेमूदादाचा मी मावसभाऊ. माझं नांव उदास. माझे सर्व दिवस आडगावांत गेल्यामुळं मला मोठी भीड वाटते. हेमुदादाच्या आज्ञेवरून एका कामाकरितां आलों आहे.

**चित्रांगीः**—वर खुर्चीवर बसा हो! बराच वेळ बसावं लागलं का ?

**हेमंतः**—आपल्याला कशाला उगीच जागे करा! जाग्या झाल्यावरच मी आपलं काम करीन ह्मणून बसलों.

**चित्रांगीः**—तुमचा चेहरा किती त्यांच्यासारखा दिसतो!

**हेमंतः**—( स्वगत ) मीच तो आहें मग त्यांच्यासारखे दिसल्यास नवल काय? ( उघड ) आह्मीं दोघेहि आईच्या वळणावर. आमच्या दोघांच्या आया अगदीं एकीसारख्या एक ह्मणून सारखेपणा. माझा हेमूदादा, ( खालीं मान करून रडल्याचें सोंग करतो )

**चित्रांगीः**—( स्वगत ) किती अव्याज माणूस, अगदीं बालवृत्ती. मलत्याच शहरीं खोटेरणाचा मागमूसहि नाहीं. अदबीनं खालीं बसायचं, सहनशीलतेमुळं दुसऱ्याची झोंपमोड करायची नाहीं. दुःखाचा कळवळाहि किती सहज, ( उघड ) सांगाल का तुमचं काम ? अगदीं भिऊं नका. हेमंतांचे बंधू तुह्मीं. तुमच्या-करितां सांगाल तें करीन.

**हेमंतः**—मला दुसरं कांहीं नको. हेमूदादानें या वस्तू व हीं पत्रं हे बिल्ले ( पाकिटातून काढतो ) हा सर्व त्याच्या अगदीं आवडीचा ऐवज आपणाजवळ देण्यास सांगितला आहे, तेवढा आपण घेऊन ठेवा. घ्या हो! अनमान नका करूं. माझ्या हेमूदादाची इच्छा आहे. त्याला हे परिक्षांतून मिळालेले आहेत. ( काकुळती येतो. )

**चित्रांगीः**—अशी काकुळती तुह्मीं करूं नका. या वस्तूकरितां दीनदुबळया भिकाऱ्यासमान हात पुढं करण्याचा माझा हक्क आहे. जगांतील अवघ्या दौलतीपेक्षां या निर्माल्याचे मोल त्यांनीं आत्महत्या केल्यापासून मला अधिक वाटतं ( तो देतो. ती त्या वस्तू घेऊन एकेक पहात बसते ) अशल्या अमूल्य मानसन्मानाचा धनी मी प्रेमानं सन्मान न केल्यामुळं-( रडूं लागते. )

**हेमंतः**—( स्वगत ) पावसाळ्यांतील सृष्टीची शोभा काजव्यांच्या कनक लिपीनं लिहिली जाते तर या पावसाळ्यांतील ही करुण माधुरी अश्रूंच्या मौक्तिक बिंदूंनीं लिहिली जात आहे. ( उघड ) तुह्मीं रडूं नका. डोळे लाल होतील. अशानं माझी स्थिति कशी होत असेल बरं ! ( रडूं लागतो. ) (स्व.) माझ्याच मरणासाठीं मला रडावं लागत आहे. मेल्यावर आपणांसाठीं मागें कोण कोण रडत आहेत हे मेलेल्या माणसाला समजायला मार्ग नसतो. पण– मेलेल्याची खोटी वार्ता उठवल्यामुळें मला मात्र तें पहातां येत आहे.

**चित्रांगीः**—उदास, तुह्मीं त्यांचे माऊस भाऊना ?

**हेमंतः**—होय ! माझ्यावर त्यांचं स्वतःच्या जीवाइतकं प्रेम होतं.

**चित्रांगीः**—त्यांच्या प्रेमांतल्या माणसांचा मला आदर का वाटणार नाहीं ? शहरी चेष्टाचार तुमच्या अंगीं एकहि दिसत नाहीं. साधे कपडे, चेहऱ्यावरचं हास्य, स्वच्छता व पवित्र मन तुमचं—

**हेमंतः**—कृत्रिम शिक्षणानं नैसर्गिक गुण नाहींसे होतात असं त्याला वाटे. सृष्टीनं दिलेलं शिक्षण हेंच खरं शिक्षण; व तेंच तूं घे असं मला तो सांगे ! मी त्याचं ऐकत गेलों त्यांतच मला समाधान वाटतं.

**चित्रांगीः**—मग सृष्टीपासून कसं शिक्षण घ्यायचं हें मला शिकवाल का ?

**हेमंतः**—असं मला लाजवीत असाल तर मी आपला जातों. रानच्या भुंग्याप्रमाणं, गरीबी, हाल, जाच यांचं विष पिऊन आह्मी साधेभोळे लोक मध जमा करतों, तुह्मी शहरी लोक मात्र मधापासून विष तयार करता ! वृन्दावनासमोरील रांगोळीवर कुणी पाय दिला तर आह्माला वात्सल्यानं रडू येतं; आणि तुमच्या शहरांतुन निव्वळ करमणुकीकरितां दळदार फुलं पावलागणिक चुरडीत असतात.

**चित्रांगीः**—असल्या बोलण्यानं मला जास्त रडूं येतं ! सृष्टीनं शिकविलेलीं तत्त्वं उच्चारतांना तुह्मी किती सात्विक दिसता !

**हेमंतः**—आणि तुह्मीं हीं तत्त्व ऐकून किती हरखून गेल्या आहांत ! अगदीं आनंद वाटतो, पण तुमच्या या पोषाखाकडे आणि अलंकाराकडे पाहिलं कीं एकदम खेड्यावर पळावसं वाटतं—( उठून जाऊं लागतो. )

**चित्रांगी**:—जाऊं नका. माझ्या या पोषाखानं आपण भिऊन जाता, दागिन्यांनीं घाबरून जाता ?

**हेमंत**:—घाबरत नाहीं पण खेद होतो. तुमच्या अंगावरील सोनं म्हणजे कोळशांत काम करण्याकरितां धरून नेलेल्या आमच्या शेतकऱ्यांचे जीव आहेत. तुमच्या अंगावरील मोती म्हणजे पोटाकरितां दिवसभर पाण्यांत पोहणाऱ्या पाणबुड्यांनीं गमावलेले आत्मे आहेत. हिरे माणकं म्हणजे कारागिरांचे काढलेले जीवंत डोळे, असल्या जीवंत माणसांची जीवसंपत्ती तुह्मीं स्वतःच्या सुखाकरितां पैदा करण्याची हांव बाळगतां याचं रडूं येतं ! माणसाचा जीव घेण्यांत भूषण मानतां तें हें असं !

**चित्रांगी**:—खरं बोललांत, मानवी मनोरथाच्या वैयर्थ्यानं सनातन समाजाची गळेदाबी केली आहे. यापुढं मी दागिनेच वापरणार नाहीं म्हणजे झालं. ( हेमंत बसतो ) हेंच सृष्टीचं ज्ञान मला शिकवा. तुमच्या आवडीचं असं काय ?

**हेमंत**:—सूर्यप्रकाश.

**चित्रांगी**:—तोच हेमंताच्या हास्याचा प्रकाश.

**हेमंत**:—पुनवेचं चांदणं.

**चित्रांगी**:—तीच हेमंतांच्या डोळ्यांतलीं किरणं.

**हेमंत**:—आश्विनाच्या पिकावरून झुळझुळ वहाणारा वारा.

**चित्रांगी**:—तोच हेमंतांच्या मधुर वाणीचा मनोहारी झरा.

**हेमंत**:—झऱ्याचं निळसर पाणी.

**चित्रांगी**:—तीच हेमंतांच्या हृदयाची शीतल पुष्करणी.

**हेमंत**:—आणि माझ्या आईच्या आठवणी.

**चित्रांगी**:—तीच तुह्मा निसर्गशिक्षणांत वाढलेल्यांची प्रेमभावना.

**हेमंत**:—पण आमच्या खेडवळ प्रेमभावनेनं विचारतों तुह्मीं अशा उभ्या का ? माझ्यासारख्या खेडवळाजवळ बसण्यांत आपणाला कमीपणा वाटतो का ?

**चित्रांगी**:—नाहीं. माझं नातं आपल्याजवळ उभंच रहाण्याचं आहे.

**हेमंत**:—मग मीहि उभाच रहातो. ( उठून उभा रहातो. )

**चित्रांगी**:—बरं मी बसते.

**हेमंत**:—मग मीहि बसतो. अगदीं जवळ जवळ बसायचं हं. ( खुर्ची तिच्या शेजारी घेऊन बसतो ती आपली खुर्ची दूर सरकावते ) या बाहेरच्या

चांद सफेतींत अवघं विश्व अगदीं न्हाणून गेलं आहे नाहीं ? हें तारागण म्हणजे चकमक्या लिपीनं लिहिलेलं सौंदर्याचं स्तवन असावंस वाटतं.

**चित्रांगीः**—ते स्वर्गी गेलेल्या हेमंताचं प्रेमस्तोत्र आहेसं मला वाटतं.

**हेमंतः**—प्रेमाचं स्तोत्र तिथं लिहीलं जात नसतं. आपल्यासारखीच्या गालावर लिहीलं जातं. प्रणयाची लिपी अधरावर असल्याशिवाय प्रेमस्तोत्राचं काव्य साधत नाहीं.

**चित्रांगीः**—अं: ! खेडवळ म्हणतां म्हणतां तुम्हाला निसर्गाचं ज्ञान बरंच झालेलं दिसतंहो.

**हेमंतः**—नाहीं, तसा मी सज्ञान आहे.

**चित्रांगीः**—मग मी आतांपर्यंत तुम्हाला खेडवळ समजत आलें ही माझी चूक तर ?

**हेमंतः**—प्रणयलीलेंत माझ्यासारखा खेडवळ आणि हेमूदादासारखा शहरी सढळ एकच.

**चित्रांगीः**—( स्व. ) एकाएकीं या खेडवळाचं डोकं तर फिरलं नाहींना ? याला मी अव्याज खेडवळ समजलें पण हा सव्याज पांग फेडूं लागला म्हणायचा.

**हेमंतः**—हं असं का बरं आतां ? तुला निसर्गाची शिकवण घ्यायची आहे ना ? बुद्धीचीं बिरुदं बाळगणाऱ्या सुशिक्षित नादानापेक्षां अशिक्षित खेडवळ पण अव्याज अशा माझ्यासारख्याजवळ लग्न करण्याची तूं हेमूदादाजवळ प्रतिज्ञा केलीस. त्यामुळंच तर त्यांनी आत्महत्या केली. आणि लगेच मी खेडवळ तुझ्या प्रेमाराधनेसाठीं धांवून आलों. आतां आपली प्रतिज्ञापालन करून माझा स्वीकार तूं केलाच पाहिजे.

**चित्रांगीः**—निर्लज्ज्या, आवेशाच्या भरांत हेमंतरावाजवळ जरी मी तशी प्रतिज्ञा केली असली तरी त्यावेळींहि या चित्रांगीच्या हृदयांत त्यांच्याविषयीं प्रेम नव्हतं असं मात्र समजूं नकोस. कुमारिकांना आपलं प्रेम एकदांच देतां येतं. तें मी हेमंतरावांना वाहिलं. तेच माझे मनोमय पती. समाजाच्या दृष्टीनं मी जरी कुमारिका असले तरी मी स्वर्गवासी हेमंताची पत्नी आहे हें लक्षांत ठेव आणि निर्लज्जपणा सोडून इथून काळं कर.

**हेमंतः**—हं. आतां असं कसं काळं करतोय ! मी दिसण्यांत असा बावळा आणि नांवानं उदास असलों तरी आचरणानं शृंगारप्रिय आणि कर्तबगारीनं



**हेमंतः**—होय, तुझा आवडता हेमंतच मी.

पृ. ९५

तुझ्या मृत पतीलाहि तुझ्यासमोर पुन्हां उभा करणारा जादुगार आहें. निमुटपणें या उदासशीं लग्नाला तयार झालीस तर ठीक आहे नाहीं तर या क्षणाला तुझ्या मेलेल्या हेमंताला तुझ्यासमोर प्रकट करावा लागेल.

**चित्रांगीः**—मुर्दाडा, या तुझ्या जादूटोण्याच्या बागुलबोवानं गोंधळून जाण्याइतकी ही चित्रांगी एखादी खेडवळ अशिक्षित मुलगी आहे असं तू समजतोस काय ?

**हेमंतः**—छे, छे, तू चांगली सुशिक्षित मानी कुमारी आहेस म्हणूनच तुझ्याशींच लग्नमंडप साजरा करण्याचा मी निश्चय केला आहे. चित्रांगी, तुला पाहिजे तसा मी खेडवळ, अन्त्यज तरुण आहे. अंतरिक्षांत वास करणाऱ्या देवता आपणा उभयतांवर आशीर्वचनाच्या मंगलाक्षता टाकावयास सज्ज झाल्या आहेत.

**चित्रांगीः**—थांब, चांडाळा, मंगलाक्षतांऐवजीं तुझ्या डोक्यांत हा दौतीचा ठोकळाच घालते ( ठोकळा मारावयास जाते. हेमंत वेष टाकतो. )

**हेमंतः**—हां ! हां ! चित्रांगी–आपल्या मनोमय पतीवर–या हेमंतावर हात उगारतेस ?

**चित्रांगीः**—कोण—हेमंत ?

**हेमंतः**—होय–रंगेलच्या बनावट पत्रामुळं तुझा नाहक संशय घेऊन पंचविशीचा गाढव बनलेला–आणि तूं माझ्याशीं लग्न न करण्याचा निश्चय केल्यामुळं निराश होऊन बाबासाहेबांच्या अनुमतीनं उदास वेषानं इथं आलेला तुझा आवडता हेमंतच मी—

**चित्रांगीः**—अखेर माझे मनोरथ पूर्ण झाले. आपण अशा रीतीनं माझी वंचना केली तर ! अगबाई, बाबा आले वाटतं ? ( श्रीरंग येतात. दोघे दोन बाजूंना दूर खुर्च्या घेऊन बसतात. )

**श्रीरंगः**—चित्रे, मृतात्म्यांना प्लँचेटवर बोलावणारे ऋषि पुष्कळ आहेत. पण या मृतात्म्याला सदेह दिवाणखान्यांत आणणारी तूं पहिली आर्ष कुमारिका दिसतेस.

**चित्रांगीः**—बाबा, तुम्हांला हें सर्व गोपन माहीत असून मला फसवलंत ना ? जासं !

**हेमंतः**—तूं एका अशिक्षित, अन्त्याज तरुणाशीं लग्न करण्याचा निश्चय केलास तेव्हां माझ्या आत्महत्येच्या गोपनाला संमती दिल्याशिवाय बाबा-

साहेबांना मार्गच नव्हता. वर्तमानपत्रें कोणी वाचीत नसतात अशी आमची खात्री असल्यामुळं इतर खोट्याबरोबर ही गोष्ट छापून दिली. आतां तूं वाचूं नयेस ती वाचलीस, त्याला बाबासाहेब काय करणार आणि मी काय करणार ?

**श्रीरंगः**—एकदरींत काय ? भांडण तंटेहि कधीं कधीं हितावह असतात. आमच्या सर्वांच्या हेतूप्रमाणं अखेर घडी नीट बसली, ठीक झालं. ( शिशीर ) कल्याणी येतात ) अरे यांचीहि लग्न-मंडपाची सज्जता झालेली दिसते.

**शिशीरः**—होय बाबासाहेब. कसं झालं तें मग सांगेन आधीं मला आशीर्वाद असावा ( दोघं नमस्कार करतात ते आशीर्वाद देतात. ) ( वृंदा-बिहारी येतात. )

**बिहारीः**—बाबासाहेब दुर्नीत बिहारी पश्चातापानें पावन झाला आहे. आह्मालाहि आशीर्वाद असावा. ( नमस्कार करतात. आशीर्वाद देतात )

**श्रीरंगः**—अखेर, वृंदा बिहारीबद्दलचेहि चित्रांगीचे फारा दिवसांचे हेतू सफल झाले ह्मणायचे.

**वृंदाः**—बाबासाहेब, आपल्या चित्रेनं माझं सौभाग्यधन मला परत मिळवून दिलं. ( नंदिनी येते. )

**नंदिनीः**—अगबाई, गलबला कसला चालला आहे ? लग्नं जमलीं वाटतं ? ह्या मेल्यांनों-सगळीं जोडपींच जोडपीं माझं घर कसं अगदीं पावन झालं.

**श्रीरंगः**—अग, आपल्या या चवथ्या जोडप्यामुळं सारींच जोडपीं पतित-पावन झालीं आहेत.

**कल्याणीः**—चवथेंच कां ? हें पहा पांचवं जोडपं आलं वाटतं. ( रंगेल, कंगाल येतात, जानू येतो. )

**रंगेलः**—अहो जोडपं कसलं. जोडप्यासाठीं सारं नाटक केलं पण शेवटीं जोड मिळते आहे तुरुंगांची.

**कंगालः**—गुलामाला हीच शिक्षा पाहिजे मला तोंडघशी पाडलंन् तें पाडलन् आणि मला मुलगी नसतांनाहि तिच्यावर लक्ष ठेवीत होता.

**रंगेलः**—साऱ्या गोष्टी खऱ्या, पण जरा ऐकून तर घ्या. हुंडा घेण्याच्या या घाणेरड्या वृथा रूढाचारामुळं माझं लग्न एका काळ्या कुचकुचीत कालिकेशीं झालेलं आहे. एकाच या गोष्टीमुळं माझे सारे गुन्हे नाहींत का माफ होण्यासारखे ?

**हेमंतः**—असं असेल तर रंगेल तुमच्याबद्दल सहानुभूती वाटते.

**रंगेल**ः—मग, मला तुरुंगांत पाठविण्याऐवजीं दातारपणीं पैसे भरून सुंदर मुली पटकावणाऱ्या जरठ देवांनाच तुरुंग का नाहीं दाखवीत? या कंगालांनाच तुरुंग दाखवा!

**चित्रांगी**ः—हो खरंच, मावशी यांनीं दत्तविधानाच्या वेळीं आपली सर्व इस्टेट तुझ्या नांवीं लिहून दिली आहे नाहीं?

**हेमंत**ः—ते कोकणी काफर सुतळीचा एक धागाहि हातीं लागू देतील? त्यांची सर्व इस्टेट गहाण पडली आहे.

**कंगाल**ः—अहो नुसती गहाण नव्हे, एका गहाणावर तीन गहाणं आहेत. कल्याणी माझी दत्तक मुलगी. आतां तिनंच मला जन्मभर पोसावं हेंच उत्तम.

**कल्याणी**ः—खुशाल रहा बरं. म्हणजे जरठविवाहांत एकाची भर पडायची तरी राहून जाईल.

**हेमंत**ः—दातारपणांत भडकूं लागलेले हे मदनाच्या म्युनिसिपालिटीचे दिवे लग्नमंडपाचे मार्ग अपशकुनी करून ठेवतात. गरीब, शीलवंत कुमारिका हुंड्यांच्या सक्तगिरींत लग्नमंडपीं मूर्खमाणसांच्या गळ्यांत पडण्यानं हरहमेश कापल्या जात आहेत. समाजांतील वृथा रूढाचाराची जाळपोळ, मोडतोड केल्याशिवाय विधायक घडी केव्हांहि बसणार नाहीं.

**कल्याणी**ः—अहो पण नाटकांतल्या सर्व जोडप्यांनीं लग्नमंडपाची सज्जता केव्हांच केली. आतां असंच किती वेळ बोलत बसायचं?

**चित्रांगी**ः—घड्याळाकडे पाहिलं का? दीड वाजला! नाटकंसुद्धां संपलीं असतील.

**हेमंत**ः—ठीक आहे. Let us retire. तूर्त झोंप घेऊं, पुढं याच विषयावर बोलूं.

**जानू**ः—ताल्यानू, जातां जातां माजां मुंडासां द्या, आन् तायानु, द्या माज्या चोल्या. मी आन् माजी कारबारीण तुमच्या पयल्याला खेळवाया येऊं बगा आतां.

[ पडदा पडतो. ]

**समाप्त.**

**यस्माज्जातं जगत्सर्वं यस्मिन्नेव विलीयते ।**
**येनेदं धार्यते चैव तस्मै विश्वात्मने नमः ॥**